आनंदविलास स. ना. मंडळी करितां.

# धनुर्भंग नाटिका



ना. ब. बामणगांवकर
उमरावती

धी प्रिंटिंग एजन्सी, पुणें.

सचित्र

# धनुर्भङ्गनाटिका

अर्थात्

# सीतास्वयंवर



लेखक

नारायण रामलिंग बामणगांवकर

अमरावती, वऱ्हाड

प्रकाशक

धी प्रिंटिंग एजन्सी, पुणें शहर

आवृत्ति पहिली

सन १९१७ आगष्ट

किंमत १२ आणे

# हृदय-निवेदन

परमेश्वराचें वास्तव्य सर्वत्र आहे. प्रत्येक हृदयांत तो वावरत आहे. म्हणून सर्व मानव समान दर्जाचे आहेत. या समान भावनेची शिकवण जो धर्म शिकवितो तोच विश्वव्यापी धर्म होय. या विश्वव्यापी धर्माचा प्रसार करणें म्हणजेच जगाची नीतिमत्ता कायम राखणें होय. अशी नीतिमत्ता राखण्याचें पवित्र कर्तव्य जो बजावतो त्यालाच ब्राह्मण, अवतार, किंवा जगन्नेता असे अधिकार प्राप्त होतात. यांच्या ठिकाणीं जगाची नीतिमत्ता राखण्याचा जो अमोल गुण असतो, त्यालाच ब्राह्मण्य अशी संज्ञा आहे. अशा प्रकारच्या विश्वव्यापी धर्माचा प्रसार करण्याकरितांच ब्राह्मण किंवा अवतारी पुरुष यांच्या मदतीला दुसऱ्या तीन कर्तव्याचे भाग पडले आहेत. क्षत्रिय, वैश्य व शूद्र हीं त्या तीन भागांचीं नांवें आहेत. व्यवहारदृष्ट्या या चौघांचीं चार भिन्न भिन्न कर्तव्यें आहेत म्हणून त्यांचा दर्जाहि कमी अधिक प्रमाणांचा असलेला दिसतो. चौघांचीं कर्तव्यें जरी भिन्न भिन्न स्वरूपांचीं असलीं तरी चौघांचें ध्येय एकच असतें. विश्वव्यापी धर्माचें पालन व प्रसार हें या चौघांचें ध्येय होय. हें ध्येय अत्यंत पवित्र असल्यामुळें चौघांच्याहि भिन्न भिन्न कर्तव्यांच्या मुळाशीं शुद्ध बुद्धि सारख्याच प्रमाणावर जागृत असते. ज्या न्यायाच्या दरबारांत शुद्ध बुद्धीच्या कमी अधिक प्रमाणाकडे नजर देऊन न्यायाचा निवाडा होतो तेथें हे चौघेहि—यांच्या कर्तव्याच्या मुळाशीं शुद्ध बुद्धि सारख्याच प्रमाणावर जागृत असते म्हणून—सारख्या दर्जाचे व सारख्याच लायकीचे ठरतात. पवित्र ध्येयाच्या व शुद्ध बुद्धीच्या एकाच सूत्रांत जोंपर्यंत हे भिन्न भिन्न कर्तव्याचे चार मणि गोंवलेले असतात तोंपर्यंत धर्म जीवंत असतो. पण या सूत्रांतून या चार मण्यांपैकीं एक मणी गळला कीं तो लागलीच पंगू होतो.

परशुरामाच्या तारुण्यावस्थेंत या सूत्रांतून क्षत्रियांच्या भागाचा मणि गळून पडला होता. त्याला पुन्हा पूर्ववत् त्या सूत्रांत गोंवावें म्हणून परशुरामानें शस्त्र हातांत घेतलें. पण पराक्रमाच्या घमेंडीनें मूळ हेतूचें पर्यवसान तो एक मणि नाहींसाच करण्यांत झालें ! त्यामुळें ब्राह्मणहि ब्राह्मण्यहिन झाले व

क्षत्रिय तर निस्तेज बनलेच. मग राहिलेले दोन मणि काय करतील ? पुढें सर्वत्र बेबंदशाही माजून धर्म शरपंजरी पडला. ब्रह्मर्षि विश्वामित्रानें जेव्हां यज्ञाला सुरुवात केली तेव्हां रावणपक्षीयांकडून ह्या यज्ञाला बरीच विघ्नें आलीं. हें संकट निवारण करण्याला कोणीहि क्षत्रिय समर्थ नाहीं, असें जेव्हां ब्रह्मर्षि विश्वामित्राच्या नजरेला आलें, तेव्हां त्यानें राजा दशरथाकडून रामलक्ष्मणांना मागून घेतले, व त्यांना धनुर्विद्या शिकवून आपल्या यज्ञाचें त्यांच्याकडून रक्षण केलें. परशुरामानें जर एकवीस वेळां क्षत्रियांचा संहार केला नसता, तर ब्रह्मर्षि विश्वामित्राला असा खटाटोप करण्याचा प्रसंग आला नसता, आणि रावणानेंहि तेहतीस कोटी देव बंदीशाळेंत घालून विश्वव्यापी धर्माच्या समानतेच्या तत्त्वाला हरताळ फांसण्याचे प्रयत्न चालविले नसते.

ज्या सहस्रार्जुनानें एकेकाळीं रावणासारख्याला आपल्या बायकांचें दास्य स्वीकारायला भाग पाडलें होतें, त्या सहस्रार्जुनासारखे महान् पराक्रमी हजारों वीर परशुरामानें एकवीस वेळां नष्ट केल्यामुळें दुर्बल झालेल्या लोकांनीं त्याच्या धनुष्यांत अद्भूतपणा उभा केला आणि परशुरामाला अवतार-मालिकेंत बसविलें. यामुळेंच जानकीच्या स्वयंवराकरितां परशुरामाच्या धनुष्याला प्रत्यंचा चढविण्याचा पण महत्त्वाचा ठरला. मनुष्य पराक्रमहीन झाला कीं त्याची बुद्धिहि विवेकहीन होते आणि त्यानेंच त्याचें मन दुर्बल होतें. हा पण जाहीर झाल्यानंतर सर्व जगावर व्यष्टिरूप सत्तेची दानव-संस्कृति निःशंकपणें स्थापन करण्याकरितां हा पण जिंकून सर्व जगांत आपण बलवान् ठरावें असें रावणाला वाटूं लागलें, आणि ब्राह्मण्य व क्षात्र हे दोन गुणमणि पूर्ववत् एकाच ध्येयाच्या व शुद्ध बुद्धीच्या सूत्रांत आणून त्यांनीं विश्वव्यापी धर्माच्या प्रसारार्थ झटावें, याकरितां रामचंद्रानें तो पण जिंकावा असें विश्वामित्राला वाटूं लागलें. या वेळीं विश्वामित्र-ब्रह्मर्षि खरोखरच या योग्यतेचे झाले होते. म्हणूनच पाणिनीनें ' मित्रे चर्षौ ' असें सूत्र बनवून विश्व-अमित्र म्हणजे ' विश्वाचा शत्रू ' असा जो, तो कौशिकसम्राट असतांना त्यांच्या नांवाला कलंक लागला होता, तो धुवून काढला. त्या सूत्राचा अर्थ असा कीं, मित्र हा शब्द अंत्य अक्षर ऱ्हस्व

असलेल्या ऋषिवाचक शब्दापुढें आला असतां अंत्य ऱ्हस्व अक्षर दीर्घ होते. अशा विश्वामित्राचा हेतु आणि रावणाचा हेतु या दोन भिन्न भिन्न हेतूंच्या परिपोषार्थच—कथासौष्ठवार्थ नव्हेच—मी ही नाटिका लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. पण महाराष्ट्राचें दुर्दैव कीं, महाराष्ट्रवाङ्मयाला पोषक असा काल अद्याप लाभत नाहीं. या कालाच्या प्रतिकूलतेनेंच या नाटिकेंत ठिकठिकाणीं विसंगतपणाचे, तत्त्वाच्या व रसाच्या अपूर्णतेचे आणि सरळ अर्थबोध करणाऱ्या शब्दांच्या उणीवीचे दोष डोळ्यांत अश्रू आणून—कारण दुसरें काय करायचें—कायम ठेवणें भाग पडलें !

हा प्रयत्न करतांना रामकालीन वरील ऐतिहासिक सत्याच्या हेतूचाच मीं आधार घेतला आहे. पण रामकथेला निरनिराळ्या कालांत निरनिराळ्या महाकवींनीं स्वतःचा तसाच स्वजनांचाहि स्वकालीन परिस्थितींतून उद्धार करण्याकरितां काव्याचें स्वरूप दिल्यामुळें त्यांत, या नाटिकेंत गोंवलेल्य ऐतिहासिक सत्याच्या हेतूचा विकास स्पष्टपणें सर्वत्र दृग्गोचर होत नाहीं. त्यामुळें रामायणमहाकाव्यांशीं परिचित झालेल्या अनेक महाराष्ट्रीयांना या नाटिकेंत, तींत घातलेल्या कांहीं प्रसंगांमुळें, अपरिचितपणा भासमान होण्याचा संभव आहे. मीं जर अनेक रामायणांतील अनेक कवींच्या दैवी स्वरूपाच्या व अद्‌भूतपणाच्या कल्पना उसन्या घेतल्या असत्या, तर त्या कल्पनालंकारांनीं नटलेली ही नाटिका नवयौवन वारवनितेप्रमाणें महाराष्ट्रांतील रसिकवरांना मोहित करायला खरोखरच कारणीभूत झाली असती. पण त्या महानुभाव कवींचें—जे काव्यरचना करतांना स्वकालीन आचारविचारांचा अवश्य विचार करीत आणि ज्यांची काळदेवता परिस्थितीची गुलाम नव्हती, तर परिस्थितीला चलन देणारी एक अद्‌भूत शक्ति होती त्या महात्म्यांचें—उच्छिष्ट भक्षण करायलासुद्धां अंगीं एक प्रकारची पात्रता पाहिजे; ती माझ्या ठिकाणीं नसल्यामुळें मीं तसें धाडस केलें नाहीं. कारण, सामर्थ्याशिवाय अधिक बोजा उचलण्याचा प्रयत्न करून शेवटीं हंसें करून घेण्यापेक्षां सामर्थ्यानुरूप कार्य करून त्यांत राहिलेल्या दोषांबद्दल होणारें हंसें भावी कार्याला अधिक यशास्विता आणतें असें मला वाटतें.

---

# आभारप्रदर्शन

माझ्यासारख्या नवीन नाटककाराच्या हातांत हात घालून माझ्या लाडक्या नाटिकेचें मातृपद स्वीकारण्याचा जिनें अधिकार संपादन केला, त्या आनंदविलास संगीत नाटक मंडळीचें सध्यांच्या स्त्रीस्वातंत्र्याच्या काळांत आभार न मानणें म्हणजे पत्नीद्रोहाच्या शासनाला पात्र होणें होय. याःकरितां पहिल्यानेंच पुत्रवती होतांना जे तिला कष्ट सोसावे लागले याबद्दल तिचे जनकद्वय रा. हरि भास्कर आपटे रा. गणेश विनायक वीरकर यांचे मानावे तितके आभार थोडेच आहेत.

१९१६ च्या मे मध्यें नाशिक मुक्कामीं माझ्या नाटिकेचा जन्म झाला. तिला बऱ्याच शारीरिक व्याधीहि जडल्या होत्या. पण त्या सर्व संकटांतून ती आज मुक्त झाल्यासारखी भासत असल्यामुळें तिला पुस्तकी पेहेराव चढवून तिचा हात वाचकांच्या हातांत देण्याचें सर्व श्रेय माझे मित्र रा. रामकृष्णपंत पराडकर ' धी प्रिंटिंग एजन्सी 'चें मालक यांना आहे. त्यांना हा पेहेराव तयार करण्याचे कामीं रा. नारायण विनायक वीरकर मुंबईतील सुप्रसिद्ध फोटोग्राफर यांनीं आनंद-विलास मंडळींतील नटांचे त्या त्या प्रसंगांचे फोटो देऊन जी अपूर्व मदत केली, व रा. विष्णुपंत दामले, सुप्रसिद्ध आर्टिस्ट व पेन्टर, यांनीं मुखपृष्ठावरील चित्र तयार करून दिलें, म्हणून या उभयमित्रांचा मी अत्यंत आभारी आहें.

पिता या नात्यानें माझ्या नाटिकेला माझा शेवटचा हाच निरोप आहे कीं, बाई ! आज तुझा आणि माहेरचा संबंध तुटला. तुझा पति गुणांचा चाहता आहे; तेव्हां तूं आपल्या गुणानें त्याला प्रिय हो. तुझ्या अंतरंगांत रामाचें वास्तव्य आहे, त्या सत्याचा त्यांत प्रकाश पडला आहे; त्यामुळें तूं चिरंजीव आहेस आणि राम तुझा पाठिराखा आहे !

ता. १९।८।१७ } नारायण रामलिंग बामणगांवकर,
आज मु० पुणें. } अमरावती, वऱ्हाड.



रा. आपटे. रा. बामणगांवकर. रा. वीरकर.

# वंदनार्पण

वंदन कवि-पद-कमला विमलचिद्बोधमधुररसरसितां त्या ।
ज्याच्या पावन कवनां बहु लाजल्या गंगादिसरिता त्या ॥ १ ॥
ज्याचें श्रीराम-कवन स्व-जन-काल-खल-घन-निवारक पवन ।
अर्पण तया नव सुमनें[1] सुभूषित जें मम बाल-मनोपवन ॥ २ ॥

सर्व महाकवींचा दास

ना. रा. बामणगांवकर

---

१ हें नाटकरूपी सुमन.

# प्रभुप्रार्थना

( चाल–जगवाली— )

जगताता ! धांवा हो ! दीना झाली भूमाता ॥ ध्रु० ॥

धर्म कर्म लव न कांहीं । कुणिहि पाळि हाय ! हाय ! ॥

रडत माय । स्मरुनि पाय । तुजविण कुणि ना त्राता ! ॥१॥

# धनुर्भङ्गनाटिका

## प्रथमकाण्ड

### चित्र पहिलें

मिथिलानगरी

( राजा जनकाच्या राजवाड्यासमोरची बाग )

गीत पहिलें ( चाल—प्रणय रवि )

**जानकीच्या सख्या:—**

अशिव हरि, सुशिव करि, वरी गौरी ।
ध्यानिं ध्यावा तो भस्मधारी ॥ ध्रु० ॥
कामअरीतें जाळुनि मारी ।
मदनसखा शिरीं कां धरी ? ॥ १ ॥
नाम सार्थ तें तांडवकारी ।
प्रभुकृति नुमजे सारी ॥ २ ॥

**जानकी:—**(हातीं धनुष्य घेऊन प्रवेश करिते व त्याचा टणत्कार करिते) अग, अशा भितां कां ? या—जवळ या; भार्गवरामाच्या या शिवचापांत भीति वाटण्यासारखें कांहीं नाहीं.

**चंद्रानना:—**जें धनुष्य मोठमोठ्या पराक्रमी वीरांना उचलत नाहीं म्हणतात, परशुरामाचें शिवचाप म्हटलें कीं, मोठमोठे वीरपुरुष भयभीत होतात, तें धनुष्य तुला ग कसें उचलतां आलें ?

**जानकी**:—अग, तसें यांत काय आहे ? ऐका याच्या टणत्काराचा ध्वनि कसा मंजुळ होतो तो ! ( टणत्कार करते. ) गंधर्वांच्या आवाजांत तरी इतकें माधुर्य आहे काय ?

**चंद्रानना**:—टणत्कार नको करूं; आम्हांला भीति वाटते गडे !

**जानकी**:—अग ! याच्या टणत्कारांत भीति आहे, याचें नांव ऐकतांच वीरपुरुषांच्या अंगाचा थरकांप होतो, वगैरे गोष्टी नुसत्या आख्यायिका आहेत. वास्तविक यांत तर तसें कांहींच नाहीं. हें धनुष्य हातांत घेऊनच भार्गवरामानें एकवीस वेळ निःक्षत्रिय पृथ्वी केली, म्हणून क्षत्रियांना याचा पिढ्यान् पिढ्यांपासून नसता वचक बसला आहे. खरें पाहिलें असतां दुबळ्या अंतःकरणाच्या लोकांनीं आपल्या कल्पनेचा यांत पोकळ बाऊ उभा केला आहे. आणि या कल्पनेचा परिणाम वीरमातांवर होऊन त्यांच्या उदरीं जन्म पावलेल्या सर्व वीरांच्या छातींत शिवधनुष्य म्हटलें कीं धडकीच भरते. हा सारा कल्पनेचा परिणाम ! पण वास्तविक यांत तसें कांहींच नाहीं.

**चंद्रानना**:—तें कांहींका असेना ? पण तूं आपली हें ठेवून ये पाहूं !

**सर्वजणी**:—होय गडे !

**चंद्रानना**:—मग आपण पुनः गौरीहराचें गाणें म्हणूं.

**जानकी**:—वेडे ! आपण गाणीं म्हणण्यापेक्षां या धनुष्याचेंच गाणें ऐकूं ! ऐक ! हें धनुष्य कसें 'गौरीहर ! गौरीहर !' म्हणतें तें ! ( टणत्कार करते )

**चंद्रानना**:—खरेंच ! या धनुष्यांतून खरेंच 'गौरीहर ! गौरीहर !' असा शब्द निघतो. पाहूं ऐकूंदे बरें पुनः आम्हांला. ( जानकी टणत्कार करते ) ऐका; ऐकला का शब्द ?

**सर्वजणी**:—खरेंच !

**जानकी**:—हा वेड्यांनो ! हा जसा निव्वळ कल्पनेचा भास तशाच याच्या पराक्रमाच्या व अद्भुत शक्तीच्या पसरलेल्या सर्व गोष्टी म्हणजे भित्र्या व दुर्बल मनाच्या लोकांनीं उभारलेल्या पोकळ वल्गना होत !

**चंद्रानना**:—खरेंच ! आपली कल्पनाच आपल्याला बाधक होते म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं.



जानकीः--हा धनु स्वजनवधकारि ना। [ पृ. ३

**जानकी**:—दुसरें काय ? बाबांसारखे ज्ञानी पुरुष देखील हें धनुष्य उचलणेंच दुरापास्त आहे, असें म्हणत असतात ! खरोखरच हें तसें आहे काय, म्हणून उचलून पहावें असें माझ्या मनांत फार दिवसांपासून होतें. पण संधिच मिळेना. आज आतां भार्गवराम बाबांच्या भेटीकरितां आले आहेत; त्यांच्या बोलण्याच्या भरांत मीं दृष्टि चुकवून आणिलें आणि पहातें तों हें धनुष्यासारखें धनुष्य !

**चंद्रानना**:—पाहूं ! दे बरें माझ्याजवळ तें ! पण नकोग बाई !

**जानकी**:—तूं अशीच भीत असायची. कारण, खेळांतच कां होईना, पण रावण मोठ्या आनंदानें होतेस. तुझा रावण दुबळ्यांचा काळ. खरा प्रतिपक्षी मिळाला कीं, तो तुझ्याप्रमाणेंच कच खाणार ! खरें पाहिलें असतां हें धनुष्य—हा भार्गवरामाचा आत्मा—तुझ्या, म्हणजे त्या दुष्ट रावणाच्या हातांत जाणें शक्यच नाहीं. तर माझ्या, म्हणजे रघुकुलदीपक रामचंद्राच्या हातांत जाणार—नव्हे गेलाच आहे. मी आतां हें धनुष्य लावून ठेवतें आणि रामचंद्रजी जर कधींकाळीं इकडे आलेच तर—

गीत दुसरें ( चाल—या नव नवल )

**हा धनु स्वजन-वध-कारि ना ? ॥**
**सखये, अर्पिन मी विबुधमखपालका ।**
**पावन करिल जो याला ॥ ध्रु० ॥**
**शाम राम तो वधिल रावणा ।**
**जो ने धर्म लयाला । लावुनि शर मग या चापाला ।**
**राक्षिल हाच जनाला ॥ १ ॥**

**परशुराम**:—( प्रवेश करून रागानें ) राजा ! हें पहा माझें शिवधनुष्य ! ( जानकी धनुष्य टाकून सख्यांसह पळून जाते. ) तुझ्या जानकीनें हें उचलून आणलें. अपमान ! राजा जनकाच्या दरबारांत या जमदग्निपुत्राचा—या परशुरामाचा—आज हा असा अपमान ?

**राजा जनक**:—महाराज ! मुलीकडून अजाणपणानें हें कृत्य घडलेलें दिसतें. आपला अपमान करण्याची आम्हां क्षत्रियांची प्राज्ञा नाहीं. म्हणून या

क्षुल्लक चुकीनें अपमान झाला असें आपण मानूं नये.

**परशुराम**:—हा अपमान नव्हे, तर काय आहे? माझें धनुष्य तुम्हांला मुलामुलींचें खेळणें वाटतें? राजा! ज्या धनुष्यानें एकवीसवेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली, ज्या धनुष्यानें क्षत्रियपत्न्यांच्या विलापांना खंड पडूं दिला नाहीं, सहस्रार्जुनासारखे वीराग्रणी ज्यानें धारातीर्थी लोळविलें, तें हें या भार्गवरामाचें पराक्रमी धनुष्य तुझ्या मुलीनें खेळणें केलें तरी हा अपमान नव्हेच काय?

**राजा जनक**:—आपल्या धनुष्याचा पराक्रम, आपल्या धनुष्याचा दरारा आणि त्याचें अद्‌भुत सामर्थ्य ह्या गोष्टींची जाणीव आम्हांला; महाराज! मुलीला कसली ही जाणीव?

**परशुराम**:—पण यामुळें केवढा अनर्थ होण्याचा संभव आहे, याची तुला कांहीं कल्पना आहे काय? या धनुष्याचा पराक्रम, याचा दरारा आणि याचें सामर्थ्य फोल आहे, असें सर्व क्षत्रियांना वाटेल! शिवाय आज धनुष्य मुलीचें खेळणें झालें; उद्यां मीहि क्षत्रियांचें खेळणें कशावरून होणार नाहीं?

**राजा जनक**:—महाराज! आपल्या अलौकिक पराक्रमाचा डंका त्रिभुवनावर अद्याप गाजत असल्यामुळें आपल्या धनुष्याकडे नुसती दृष्टि फेंकण्याचें देखील सामर्थ्य या भूमंडळांत एकाहि वीराचे अंगीं नाहीं; व पुढें तें येईल असेंहि वाटत नाहीं. मग आपणांला खेळणें करणें तर दूरच राहिलें.

**परशुराम**:—राजा! जगांत ज्याला आपलाच दरारा कायमचा ठेवावयाचा असतो, आपलेंच वर्चस्व ज्याला अखेरपर्यंत त्रिभुवनावर गाजवावयाचें असतें, त्याला ह्या गोष्टी नेहमीं पराक्रमाच्या बलावर साध्य करितां येत नसतात; तर एकेकाळीं गाजविलेल्या पराक्रमाची सर्व जगाला दहशत बसवून त्या साध्य करावयाच्या असतात. एकाद्या वीरमातेच्या उदरांत आपला प्रतिपक्षी जन्म घेत असला तर पूर्व पराक्रमाच्या भयद आख्यायिका वीरमातेच्या कानावर आदळतांच गर्भावस्थेतच त्याचें खंबीर अंतःकरण दुर्बळ झालें पाहिजे. मी गाजविलेल्या अद्‌भुत पराक्रमामुळें माझी व या माझ्या शिवचापाची सर्व वीरांना आणि सर्व वीरपत्न्यांना आजपर्यंत एक प्रकारची दहशत बसली होती. आणि म्हणूनच मीं जिंकलेलीं सर्व राज्यें ब्राह्मणा-

र्पण करून स्वस्थ बसलों, तरी मला प्रतिपक्षी निर्माण होत नाहीं. पण आज माझें धनुष्य तुझ्या मुलीनें खेळणें केल्यामुळें हा परशुराम लवकरच निस्तेज होणार असें माझें मलाच वाटू लागलें आहे.

**राजा जनकः**—महाराज! आपल्या मनालाच ज्या अर्थी असें वाटतें त्या अर्थी भगवंताची इच्छा काय आहे हें कोण सांगणार?

**परशुरामः**—परमेश्वराची इच्छा कांहींहि असो; पण माझी प्रतिज्ञा भंग केल्याच्या पापाबद्दल तुझ्या जानकीनें प्रायश्चित्त घेतलेंच पाहिजे.

**राजा जनकः**—काय? प्रायश्चित्त? माझ्या लाडक्या जानकीला प्रायश्चित्त?

**परशुरामः**—होय, तुझ्या लाडक्या जानकीला प्रायश्चित्त! मुलगी म्हणून नुसत्या प्रायश्चित्तावर तरी भागवितों. वीर असता तर त्याला देहान्त प्रायश्चित्त दिलें असतें. राजा! सर्व बलवान् क्षत्रियांचा संहार करून त्यांचीं राज्यें ब्राह्मणार्पण करितांना, या माझ्या शिवचापाला जो क्षत्रिय वीर स्पर्श करील त्याबरोबरच मी युद्ध करीन, इतरांबरोबर करणार नाहीं, अशी मीं केलेली शेवटची प्रतिज्ञा तुला अवगत आहेना? तुझी जानकी जातीची स्त्री असल्यामुळें ह्या प्रतिज्ञेपासून मला भ्रष्ट होण्याचा प्रसंग आला आहे. मला—या जमदग्निपुत्राला प्रतिज्ञाभंग केल्याच्या पापाबद्दल तुझ्या जानकीनें कडकडीत ब्रह्मचर्यव्रताचा अंगीकार केला पाहिजे. हेंच योग्य प्रायश्चित्त!

**राजा जनकः**—नका! महाराज! माझ्या जानकीला एवढें कठिण प्रायश्चित्त सांगू नका.

**गीत तिसरें** (चाल—आजवरि नांदले)

**एकुलति जानकी बाळ मम लाडकी।**
**जाण लतिका जशी डुलत मम अंतरीं ॥ ध्रु० ॥**
**अदया लोह—घन। पडतांच तिज मरण।**
**व्हा बुधा! सदय लव। नम्र चरणावरी ॥ १ ॥**

**परशुरामः**—ऊठ! या परशुरामाच्या मुखांतून एकदां शब्द निघाला, आणि मग सारें ब्रह्मांड जरी दग्ध होण्याचा प्रसंग आला, तरी तो बदलायचा नाहीं. ब्रह्मांडापेक्षां मी माझ्या शब्दालाच अधिक किंमत देतों. माझा

शब्द, माझी प्रतिज्ञा पूर्ण व्हावी आणि तुझ्या जानकीनेंहि प्रायश्चित्तांतून मुक्त व्हावें, अशी जर तुझी इच्छा असेल, तर त्याला एकच उपाय आहे.

**राजा जनकः**—महाराज! कोणता उपाय?

**परशुरामः**—तिच्या स्वयंवराकरितां या धनुष्याला प्रत्यंचा चढविणें, हाच पण तूं जाहीर कर. पण हें लक्षांत ठेव कीं, हा पण जिंकणारा जर आर्य क्षत्रिय असला तर त्याला माझ्याबरोबर युद्ध करावें लागेल. आणि या युद्धांत जर तो जगला तरच जानकीला पति होईल. नाहीं तर तिला जन्मभर अविवाहितच राहणें भाग पडेल. याशिवाय तुझ्या जानकीला दुसरा तरणोपाय नाहीं, आणि माझ्या मानभंगाच्या व प्रतिज्ञाभंगाच्या पापाला दुसरें प्रायश्चित्त नाहीं. [जातो]

**राजा जनकः**—खरोखरच

**गीत चवथें** (चाल—त्यजि न तरू जशी)

**नच कळत प्रभूची माया।**
**बुध गाया घेइं। जाइं मति लया ॥ ध्रु० ॥**
**शेषराया मुखिं विषज्वाला।**
**निर्मियला त्या नकुल तो माराया ॥ १ ॥**
**ऐशी ज्याची अघटित माया।**
**शीतल उष्मा नाशि एक दुजिया ॥ २ ॥** [पडदा]

---

## चित्र दुसरें

जानकीचा महाल

**जानकीः**—(हातांत रामप्रतिमा घेऊन प्रवेश करते)

**गीत पांचवें** (चाल—हृदयीं पेटवोन)

**दिसतां रामवीर प्रतिमेंत नयना।**
**मन होत रत चुरित त्या पुण्य चरणां ॥ ध्रु० ॥**

मन लोहसें चुंबितें रामपायां ।
त्याजिलाच निजधर्म चपलता कां मना ? ।। १ ।।

हे प्रतिमे ! बोल; प्रेमाचा एक शब्द तरी बोल ! काय बोलतच नाहींस ? इतकी का तूं रामरूपीं तल्लीन झालीस ?

**चंद्रानना**:—( पडद्यांतून ) जानकी ! अग जानकी !

**जानकी**:—( स्वगत ) होय; झालेली दिसतेस खरी. तुझा आणि रामचंद्राचा अगदीं एकजीव झाला आहे ! जेथें दोन जीव एक होतात तेथेंच आनंदाचा प्रचंड गजर नित्य सुरू असतो; आणि खरेंच, त्या गजरांत तुला माझा शब्द कसा ऐकूं येईल बरें ?

**चंद्रानना**:—( पडद्यांतून ) जानकी ! अग जानकी !

**जानकी**:—आणि म्हणूनच तूं बोलत नाहींस. होय. हेंच खरें. पण मी तरी वेडीच कीं नाहीं; उगीच तुझ्या तंद्रीचा भंग करते. बाई प्रतिमे ! तूं अशीच सदा रामरूपीं लीन असलीस म्हणजे मी तुझें असें दर्शनच घेत राहणार !

**चंद्रानना**:—( प्रवेश करून ) काय ग ? मीं किती तरी अन् केवढ्यानें हाका मारल्या; पण तूं हूं कीं चूं केलें नाहींस ? कशांत एवढी गर्क झाली होतीस ? हं ! या प्रतिमेंत सारें तुझें लक्ष असावें. तरी म्हटलें बोलत कां नाहींस अगदीं !

**जानकी**:—आलीस का तूं ? ये. पहा बरें, हा रामचंद्राचा मुखचंद्र तुझ्या रावणापेक्षां किती शांत व आनंदी आहे तो ! आपल्या प्रत्येक कृतीनें सर्व प्राणिमात्रांना सुख व आनंद देणें, हें रामचंद्राचें साध्य आहे; आणि यांतच रामाचें रामपण आहे. पण तुझा रावण सर्व प्राणिमात्रांना चुरडीत एखाद्या क्रूर व उन्मत्त पशूप्रमाणें आयुष्य कंठीत आहे.

**चंद्रानना**:—( थोडें हंसून ) बरें, माझा रावण कसाहि असो; पण ज्या रामाला तूं आपला समजतेस, तो कुठें तुझा होऊन राहिला आहे ? त्याला या प्रतिमेनें आपलासा केला, म्हणून तो सर्वस्वीं इचा झाला. तुझा व्हायला त्यानें यावें तरी आतां कोणत्या मार्गानें ? आणि यावें असें वाटलेंच तरी ही प्रतिमा त्याला कशी येऊं देईल ? कारण, या प्रतिमेची तूं भावी सवत

आहेस. सवतीपासून होतां होईल तों आपल्या प्रियकराला दूर ठेवणें हें प्रत्येक स्त्रीचें कर्तव्य आहे.

**जानकीः**—बाई प्रतिमे! तूं आपल्या कर्तव्याला नेहमीं अशीच जाग. मी मत्सरग्रस्त होऊन तुझा राम हिरावून घेत नाहीं बरें! मी तुला वियोग-दुःखांत लोटून देणार नाहीं. मी काय करणार हें सांगू का तुला? तूं राम-रूपीं संलग्न झाली आहेस म्हणून मी तुलाच नेहमीं अशी हृदयाशीं बाळग-णार! कारण, तूं माझ्या रामाला प्रिय म्हणून मलाहि प्रिय आहेस. चंद्रा-नने! ये; अशी जवळ ये आणि ही रामप्रतिमा पहा बरें.

**चंद्राननाः**—पाहिली आहे मीं–पुन्हां पुन्हां कशाला दाखवितेस?

**जानकीः**—हा विशाल भालप्रदेश पहा. ही विशालता कीनै रामाच्या उदात्त विचारांची विश्वव्यापकता दर्शविते. ही डौलदार छाती म्हणजे दीनांच्या रक्षणार्थ निसर्गानें अभेद्य दुर्गच बांधला आहे, असा भास होतो. आणि हें हास्यवदन पाहून तर भावी मानवी उत्क्रांतीचें कमलच प्रफुल्लित झालें, असें वाटतें.

**चंद्राननाः**—खरेंच गडे! पण मी येथें येऊन विसरलेंच. मी कशा-करितां बरें येथें आलें होतें? होय. मी तुला जलक्रीडेकरितां बोलावूं आले. चलतेसना? तिकडे हंसा, शांत वाट पहात आहेत.

**जानकीः**—अग ही राममूर्ति डोळे भरून पहा अगोदर.

**चंद्राननाः**—कशाला? आणि तूं तरी पाहून पाहून काय मिळविणार? तुझ्या वराची योजना करणें तुझ्या मनावर नसून ती पणावर आहे. परंतु अगोदर चल पाहूं तिकडे.

**जानकीः**—थांब ग थोडी. या प्रतिमेकडे तर पहा!

**गीत सहावें** ( चाल–मी गरलमुखि फणा )

या वदन–नभिं प्रभा। ही गुलालसमचि लाल
बालरविची विलसित ना?॥ ध्रु० ॥

**चंद्राननाः**—( तिचा हात धरून ) हें ग काय? तिकडे वेळ होतो गडे! (तिला ओढूं लागते)

जानकी:—

अधर कमलवदन जाण । बघुनि हा प्रभातकाळ ।
विकसुनि हें हंसत फार । कां निसर्ग–भा ॥ १ ॥

( चंद्रानना ओढून नेते )

---

## चित्र तिसरें

### लंका

( गवालाक्षाचा महाल )

गवालाक्ष:—( हातांत पत्रिका घेऊन ) राजा जनकाकडून हें काय लिहून आलें आहे कुणाला ठाऊक ! मला वाटतें, राजा जनकाच्या दरबारांत चांगलें स्वच्छ व स्पष्ट अक्षर लिहिणारे कारकून नसावेत; असते तर इतक्या गचाळ अक्षरांनीं लिहिलेली ही पत्रिका कशाला पाठविली असती ? का त्याच्या दरबारांत सारेच माझ्यासारखे अश्वपति म्हणजे महारथी आहेत ? आम्हां अश्वपतीसारखीं थोर माणसें चांगलें स्वच्छ अक्षर लिहिणें हें थोरपणाचें लक्षणच नव्हे असें समजत असतात. कारण, आम्हांला जर स्वच्छ अक्षर लिहितां आलें, तर कारकुंडे कुणी जवळ बाळगावेत ? कारकुंड्यांच्या पोटापाण्याची व्यवस्था लावण्याकरितां–होय इतकी उदार बुद्धि आम्हीं न बाळगावी तर कुणी ? बरोबर आहे. कारकुंड्यांच्या पोटापाण्याची व्यवस्था लावण्याकरितां आम्हीं स्वच्छ अक्षर लिहितां कामा नये इतकेंच नव्हे, तर त्यांच्याकारितां आम्हीं निरक्षर राहणेंच उत्तम ! पण ही पत्रिका–अरे कर्पूर ! कर्पूर ! ए कर्पूऱ्या ! ( ओ, ओ, असें पडद्यांतून कर्पूर ओरडतो ) चल इकडे ये लौकर !

कर्पूर:—हा आलों. काय म्हणणें आहे आपलें ?

गवालाक्ष:—' काय म्हणणें आहे आपलें ? ' काय म्हणालास–कसें म्हणालास–पुन्हां म्हण पाहूं ! काय रे ! तुला कांहीं लाज वाटते का ?

**कर्पूरः**—लाज ? मला काय म्हणून लाज वाटेल ? बायका म्हणे लाजाळू असतात.

**गवालाक्षः**—मूर्खा ! तुला कांहीं शिस्त म्हणून कळते का ? गुलामानें धन्याशीं कसें वागावें या बाबतींत तुमच्या आर्यावर्तांत कांहींच शिस्त दिसत नाहीं ? अगदींच रानवट तुम्हीं !

**कर्पूरः**—शिस्त ? गवालाक्ष सरकार ! या ुमच्या लंकेंत शिस्तींचें फारच बंड आहे. बसण्यांत शिस्त, उठण्यांत शिस्त, चालण्यांत शिस्त, पोषाखांत शिस्त, खाण्यांत शिस्त, पिण्यांत शिस्त, जेथें तेथें आपली शिस्त !

**गवालाक्षः**—कर्पूर ! अधिक बोलावयाचें नाहीं. मी विचारतों तेवढ्याच प्रश्नांचें उत्तर दे. गुलामानें धन्याशीं कसें वागावें, यांतील सभ्याचार ऊर्फ शिष्टाचार ुला कांहीं अवगत आहे काय ?

**कर्पूरः**—गुलाम आणि धनी हें नातेंच कसें तें मला ठाऊक नाहीं. मी आहे ऋषिकुमार—परशुरामाचा शिष्य ! आपल्या रावणमहाराजांच्या दूतांनीं मला बळजबरीनें इकडे आणलें. म्हणून ही लंका तरी मला पहायली मिळाली. तेव्हां मला धनी आणि गुलाम हें नातें कसें समजणार ?

**गवालाक्षः**—तुमच्या आर्यावर्तांतील मोठमोठ्या राजघराण्यांत किंवा आमच्यासारख्या मोठ्या घरंदाज ऊर्फ परंपरागत अश्वपतींच्या घराण्यांत धनी आणि गुलाम यांत जो शिष्टाचार आहे, तो तुला कांहींच अवगत नाहीं.

**कर्पूरः**—आम्हां ऋषिकुमारांना कशाला ही असली घरंदाज अश्वपतीची घराणीं पहायला मिळतात ? कारण, आमचे गुरुजी पडले क्षत्रियांचे द्वेष्टे. ते तर कधींहि क्षत्रियांच्या दारांत पाय ठेवित नाहींत. गेलेच तर राजा जनकाच्या दरबारांत जातात. पण तेथें काय ? सर्वत्र शांतता व समता !

**गवालाक्षः**—मग मी ुला अगोदर धनी आणि गुलाम यांमधील शिष्टाचार शिकवितों. आतां पहिल्यानें असा विचार कर कीं, आपणा दोघांत धनी कोण आणि गुलाम कोण ?

**कर्पूरः**—( स्वगत ) धनी आणि गुलाम—गुलाम आणि धनी ( उघड ) होय. म्हटलें मी धनी आणि आपण गुलाम !

**गवालाक्षः**—मूर्ख ! जंगली कुठला ! अरे गद्धया ! धनी आणि गुलाम

ह्या दोहोंत श्रेष्ठ कोण ?

**कर्पूरः**—श्रेष्ठ कोण ? ( स्वगत ) धनी–धनी हा दोनअक्षरी शब्द आणि गुलाम–गुलाम हा तीनअक्षरी शब्द ! ( उघड ) सरकार ! धनी या शब्दापेक्षां गुलाम हा शब्द एका अक्षरानें अधिक असल्यामुळें गुलामच धन्यापेक्षां श्रेष्ठ ! का बरोबर आहेना उत्तर ?

**गवालाक्षः**—किती मठ्ठ आहेस रे तूं ! तुमच्या आर्यावर्तांतील सारेच लोक असे मठ्ठ आहेत का ?

**कर्पूरः**—छे ! छे ! छे ! ते जर मठ्ठ असते, तर आपल्या रावणमहाराजांच्या दूतांच्या हातांत असें माझ्याप्रमाणें मुकाट्यानें आले नसते. तुम्हां दैत्यांच्या ताब्यांत निमूटपणें येणारा आणि त्यांतच आनंद मानणारा जो तो मठ्ठ म्हणजे माझ्यासारखा, अशी तिकडे मठ्ठपणाची व्याख्या आहे !

**गवालाक्षः**—गद्ध्या ! पुरे कर तुझें हें मठ्ठपणाचें चऱ्हाट ! हें पहा, धनी आणि गुलाम असें तुझें व माझें नातें आहे.

**कर्पूरः**—पण मी कुठं तसें नाहीं म्हणतों ? मी धनी व आपण गुलाम असेंच आपलें व माझें नातें आहे. अगदीं रास्त !

**गवालाक्षः**—तसें नाहीं. धनी व गुलाम यांत धनी मी आणि गुलाम तूं.

**कर्पूरः**—असें काय ? मग ' धनी व गुलाम असें तुझें व माझें नातें आहे ' असें आपण कसें म्हणालां ?

**गवालाक्षः**—' माझें व तुझें ' म्हणायचें सोडून ' तुझें व माझें ' असें चुकून म्हणालों !

**कर्पूरः**—तर मग मी आपला चुकून धनी झालों होतों म्हणायचें !

**गवालाक्षः**—आतां हें लक्षांत ठेव कीं, मी धनी व तूं गुलाम. आतां तूं म्हणजे गुलामानें, माझ्याशीं म्हणजे धन्याशीं, कसें वागावें, हें मी तुला शिकविणार आहें. धन्यापुढें गुलाम आला असतां त्यानें धन्याला असा साष्टांग प्रणिपात करावा.

**कर्पूरः**—कसा म्हटलें ?

**गवालाक्षः**—हा असा. ( पुनः करून दाखवितो. )

**कर्पूरः**—म्हटलें, पुनः एकदां. म्हणजे ह्या माझ्या मठ्ठ डोक्यात

चांगला प्रकाश पडेल.

**गवालाक्षः**—माझ्या समोरून येतां जातां नेहमीं असा नमस्कार करीत जा.

**कर्पूरः**—ठीक आहे.

**गवालाक्षः**—म्हणे ' ठीक आहे '! असें नाहीं म्हणायचें. ' आज्ञा शिरसावंद्य महाराज ' असें म्हटलें पाहिजे. म्हण पाहूं.

**कर्पूरः**—आज्ञा शिरसावंद्य महाराज !

**गवालाक्षः**—शाबास ! बरें कर्पूर ! पत्रिका तुला वाचतां येते का ? राजा जनकाच्या दरबारांत कारकुनांचा अभाव दिसतो. नाहीं तर इतक्या गचाळ अक्षरांनीं लिहिलेली पत्रिका त्यानें पाठविलीच नसती.

**कर्पूरः**—महाराज ! हें काय गचाळ अक्षर ? किती स्वच्छ आणि सुंदर अक्षर हें !

**गवालाक्षः**—अक्षर जर स्वच्छ व सुंदर असतें, तर तें मला खात्रीनें वाचतां आलें असतें. मला वाचतां आलें नाहीं, त्या अर्थीं हें अक्षर गचाळच म्हटलें पाहिजे, आणि म्हणून तर ही पत्रिका आज चारसहा दिवसांपासून न वाचतांच पडली आहे !

**कर्पूरः**—म्हणजे आपणांला जें अक्षर वाचतां येत नाहीं तें गचाळच म्हणावयाचें हा खासा न्याय !

**गवालाक्षः**—दुसरें काय ? अक्षरांत इतका सुंदरपणा असावा कीं, निरक्षर मनुष्य देखील तें वाचून साक्षर झाला पाहिजे ! म्हणजे ज्याला ओनामा सुद्धां येत नाहीं, तो देखील तें घडघड वाचूं शकला पाहिजे. तरच तें सुंदर अक्षर ! असा गुण या अक्षरांत नाहीं म्हणून तर हें गचाळ ! बरें ही पत्रिका वाचून थोडक्यांत तिच्यातील आशय सांग पाहूं.

**कर्पूरः**—( पत्रिका वाचून ) तात्पर्य इतकेंच कीं, राजा जनकानें आपल्या जानकीच्या स्वयंवराकरितां एक पण जाहीर केला आहे. क्षत्रियांचे कट्टे शत्रु जे भार्गवराम त्यांच्या अति प्रबळ अशा शिवचापाला प्रत्यंचा चढविण्याचा हा पण आहे. हा पण जिंकणाराला जानकी तर मिळेलच; पण याबरोबरच जनकराज्यहि आंदणादाखल मिळणार आहे. तेव्हां हा

मंगलसमारंभ आपण सहकुटुंब सहपरिवार येऊन साजरा करावा, अशी राजा जनकानें आपण रावणमहाराजांचे दरबारी अश्वपति म्हणून यांत आपणांला विनंति केली आहे.

**गवालाक्षः**--ठीक आहे. धनुष्याला प्रत्यंचा चढविणें तें काय ? आपण तर हां हां म्हणतां प्रत्यंचा चढवून जानकी व जनकराज्य मिळविणार ! खात्रीनें मिळविणार ! कर्पूर, मिळविणार कीं नाहीं ?

**कर्पूरः**—यांत काय संशय !

**गवालाक्षः**--मिळविणार कीं नाहीं ?

**अशीलाः**--( प्रवेश करून ) हें काय ! आज कसला इतका आनंद !

**गवालाक्षः**—कर्पूर, मिळविणार कीं नाहीं ?

**कर्पूरः**--यांत काय संशय !

**अशीलाः**--मूर्खा, यांना तूं खूळ लावणार कीं काय ? काळतोंड्या मेला ! [ लाथ मारते. ]

**कर्पूरः**—( स्वगत ) हं ! काळतोंड्याला कोणीहि लाथा माराव्यात.

**गवालाक्षः**--प्राणप्रिये, रागावूं नकोस याच्यावर. मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. मी राजा होणार आणि तूं राणी होणार. मोठ्या आनंदाची गोष्ट आहे.

**अशीलाः**—काय ! राजा अन् राणी ! आपण स्वप्नांत तर नाहीं ?

**गवालाक्षः**—तुला नाहींच कळायचें. अग, या पत्रिकेंत राज्य आहे राज्य. म्हणजे पराक्रमाशिवाय राज्य कसें मिळवावें याची युक्ति यांत आहे. राजा जनकानें आपल्या जानकीच्या स्वयंवराकरितां एक पण लाविला आहे. धनुष्याला प्रत्यंचा चढविण्याचा हा पण जिंकल्यावर मग काय मी राजा आणि तूं राणी !

**अशीलाः**—आणि पणांत जिला जिंकणार ती आपली कोण होणार ?

**गवालाक्षः**—रागावूं नये माझ्या सुंदरीनें—म्हटलें सांगूं का ती कोण होणार म्हणून ? सांगूं ? ती जानकी तुझी दासी होणार दासी ! तेव्हां माझ्या लाडकीनें इतक्यांतच मत्सरग्रस्त होऊन निष्कारण आपल्या जिवाला त्रास करून घेऊं नये !

अशीलाः—खरेंच का ?

गवालाक्षः—खोटें नाहीं. अरे कर्पूर ! इकडे ये, हिचें नखशिखान्त परीक्षण कर. म्हणजे पायाच्या नखाच्या शेवटच्या टोंकापासून तों डोकीच्या केसाच्या शेवटच्या अग्रापर्यंत ! आणि सांग कीं, जानकी इच्याइतकी सुंदर आहे काय ! अरे नसायचीच सुंदर !

कर्पूरः—सुंदर ! सुंदर म्हणजे काय ?

गवालाक्षः—अरे, सुंदर म्हणजे ही अशी !

कर्पूरः—महाराज, या अशीलामाईंना सुंदर म्हणावें कीं नाहीं हा एक मोठा वादग्रस्त प्रश्न आहे. कारण, सुंदरपणाची व्याख्याच आजपर्यंत निश्चित झाली नाहीं. आपल्या रावणमहाराजांचे बंधु कुंभकर्णमहाराज यांच्या वक्रतुंडाचें आणि मंडलाकृति अशा विश्वव्यापी विशाल उदराचें वर्णन करितांना 'विशालदंती सुंदरकांति' असें कवी म्हणतात ! अशा प्रकारची कवी लोकांनीं सुंदरपणाची ओढाताण केल्यामुळें सुंदरपणाला मर्यादाच राहिली नाहीं. तें अमर्याद झालें. मग जानकी अशीलामाईपेक्षां सुंदर आहे कीं नाहीं या प्रश्नाचें उत्तर मी कसें देऊं ?

अशीलाः—धनुष्याला प्रत्यंचा चढविणें हा पण कसला ? खरंच का असा पण आहे ?

गवालाक्षः—आर्यावर्तांतील सर्व क्षत्रिय वीर भार्गवरामानें नष्ट करून त्यांचीं राज्यें ब्राह्मणांना अर्पण केलीं. उरलेल्या कांहीं क्षत्रियांजवळ धनुष्यें होतीं; पण तीं देखील त्या जमदग्निपुत्रानें हिरावून घेतलीं आणि त्यांना कायमचें निःशस्त्र करून ठेविलें. यामुळें आर्यावर्तांतील वीरांना धनुष्य अगर शस्त्र कसें असतें हें मुळीं दोनतीन पिढ्यांपासून अवगतच नाहीं. अशा स्थितींत धनुष्याला प्रत्यंचा चढविणें हें महत्त्वाचें कृत्य नाहीं काय ?

अशीलाः—पण आपण तरी धनुष्याला प्रत्यंचा चढवाल काय ?

गवालाक्षः—शंका आहे वाटतं ? मी आतांपासून त्याचा अभ्यासच सुरू करणार आहें. कर्पूर ! आमच्या शस्त्रागारांत जा; आणि तेथें आमच्या आजोबांचीं मोठमोठीं धनुष्यें आहेत तीं घेऊन ये. ( कर्पूर जातो. ) तुला आतां प्रत्यंतर आणून देतों. अभ्यासानें काय साध्य होत नाहीं ? वाळूच्या



**गवालाक्षः**—अरे सुंदर म्हणजे ही अशी, [ पृ. १४

कणांतून देखील तेल काढितां येतें. प्रयत्न करून अशक्य तें शक्य करून दाखविणें हें तर आम्हां भौतिकसुखवादी दानवांचें ब्रीद आहे, हें तुला ठाऊक नाहीं वाटतें ?

**अशीला**:––अहाहा ! दिवे ओवाळा. म्हणे अभ्यास करून पण जिंकणार. शूरच तसे आपण.

**गवालाक्ष**:––हं ! असा माझा उत्साहभंग करूं नकोस. मंदोदरी महाराणीसाहेब आपल्या पतीचा नेहमीं असाच उत्साहभंग करीत असतात. वाईट खोड ! तसें तूं करूं नकोस. राणीपद तुला मिळणार नाहीं. रावणमहाराजांनीं देवलोक जिंकला, मी जनकराज्य जिंकणार !

[ कर्पूर धनुष्यें घेऊन येतो.]

**कर्पूर**:––हीं घ्यावींत.

**गवालाक्ष**:––इकडे ये, असा जवळ ये. अरे, भिऊं नकोस. (कर्पूर जवळ जातो तोंच त्याचा कान पिळतो) कान कां पिळतों, हें समजलें ?

**कर्पूर**:––नाहीं.

**गवालाक्ष**:––नाहीं ? नाहीं ?? नाहीं ???

**कर्पूर**:––होय. समजलों ! शिस्त चुकलों !

**गवालाक्ष**:––(कान सोडून) आतां कसा शहाणा झालास ! पहा मी प्रत्यंचा चढवितों. (धनुष्याला प्रत्यंचा चढविल्यावर) का मी राज्य जिंकणार कीं नाहीं ?

**अशीला**:––वेडबीड तर नाहीं लागलं ? पण मला कुठें वेळ आहे असला चहाटळपणा पहायाला. [ जाते.]

**गवालाक्ष**:––जा. खुशाल जा. पण जिंकून जानकी जिंकली कीं तुला सोडचिठ्ठी दिलीच. (दुसऱ्या धनुष्याला प्रत्यंचा चढवून) कर्पूर ! आहे–माझ्यांत कशी कर्तबगारी आहे ? (धनुष्य उरावर घेऊन पडतो) मी पण जिंकणार कीं नाहीं ?

**कर्पूर**:––जिंकलाच पाहिजे.

**गवालाक्ष**:––(उठून) चल, उचल हीं धनुष्यें. रावणमहाराजांनीं देवलोकावर विजय संपादन केला म्हणून उद्यां विजयोत्सवाचा दरबार आहे.

तेथें मी माझा हा पराक्रम महाराजांच्या नजरेस आणणार आहें. तेव्हां हीं धनुष्यें अशींच्या अशीं नेऊन ठेव जा. [ दोघे दोहींकडे जातात.]

---

## चित्र चवथें

आर्यावर्त—विश्वामित्राच्या आश्रमाजवळील अरण्य

( रामलक्ष्मण प्रवेश करितात )

गीत सातवें ( चाल–दावि पथा हे मातें )

**रामचंद्रः**—

**भासत हा द्राक्षाचा संघ । न वा सुजनांचा–**
**संघ न वा सुजनांचा ।। ध्रु० ।।**
**कोमला लता अशा बालका । जनन दे नवल जाण ।**
**वसुमतिमाता कां न देई जनन अशांना फार ? ।। १ ।।**

अहाहा !

**लक्ष्मणः**—दादा ! गुरु विश्वामित्र राजा जनकांनीं जाहीर केलेल्या पणाच्या समारंभाकरितां आज आपणांला घेऊन निघणार आहेत. तेव्हां आश्रमांत नको का लवकर जायला ? आपण तर सृष्टिसौंदर्याच्या निरीक्षणांतच गढून गेलेले दिसतां.

**रामचंद्रः**—अशा शुभ प्रसंगीं निसर्गानें मला हा प्रसादच अर्पण केला म्हणायचा. तो पण मीं जिंकावा, अशी गुरुजींची फार इच्छा आहे. तेव्हां हा प्रसाद त्या इच्छेला एक प्रकारचा शुभशकुनच समजला पाहिजे. लक्ष्मणा ! या द्राक्षांचें सेवन जसें शरीराला पोषक आहे, तशीच यांची ठेवणहि मनाला बोधप्रद आहे. या चिमुकल्या फळांचा बनलेला हा संघ केवढा वजनदार आहे ! मनुष्यप्राण्यांत जर याप्रमाणें संघ करून राहण्याची शक्ति असली, तर मनुष्य म्हणजे या निसर्गाचा एक अभेद्य दुर्ग म्हणून यावच्चंद्र दिवाकरौ पृथ्वीवर अजिंक्य होऊन राहील. हे निसर्गाच्या प्रसादा ! तुझ्या दृश्य

चरित्रांत किती तरी बोध घेण्यासारख्या गोष्टी आहेत? अलौकिक बुद्धिमत्तेच्या थोर पुरुषांनीं तुझ्याजवळूनच बोधग्रहण करून जगताला जीवित-क्रमण कसें करावें याचा धडा शिकविला आहे. आणि यांनाच सामान्य बुद्धीच्या लोकांनीं अपौरुषेय अशी संज्ञा देऊन आपल्या मानसिक दुर्बलतेचें प्रदर्शन केलें आहे.

गीत आठवें (चाल—मनमोहन सावरोरे)

हा आनंददायी ज्ञानसुधा दे जना ॥ध्रु०॥
सेवन जो करी तोषवी स्वमना।
तो जनास वंदना। योग्य ना? ॥१॥

लक्ष्मणा! सूक्ष्मदृष्टीनें पाहिलें असतां, मानवी बुद्धीचा सामान्य बुद्धीला थक्क करून सोडण्याइतका विकास व्हावयाला ह्या निसर्गाची घटना कारणीभूत झाली आहे, होत आहे, व होणार आहे. वृक्षांपासून फळाचें पतन होणें ही जरी सहज क्रिया असली, तरी तिच्यापासून मनुष्याला एकाद्या तत्त्वाचा शोध लावितां येतो. म्हणून लक्ष्मणा! या प्रसादाच्या मूळ शिकवणीपासून मीं असा निश्चय केला आहे कीं,—

गीत नववें (चाल–ढुंढ्ढ कहा अब मेरा०)

प्राण सदा जन-कार्या माझा।
कायाही मम परिता प्राण हा ॥ध्रु०॥
शिकवण ही जीवन रामाला ॥१॥

जातात.]

## चित्र पांचवें

### लंका—रावणाचा दरबार

[ रावण, मंदोदरी, देवगुरु, दैत्यगुरु, गवालाक्षादि मानकरी व इतर राजे. ]

**नृत्यांगनाः—**

गीत दहावें ( चाल—हे अमर पद )

या नृपतिपदिं भुवन रत हो सदा।
तो बलि अमरराज अतितर नमवि
शिरकमल जयाच्या पदा ॥ध्रु०॥
चंचल कमला मंगल ललना तव बला।
भिउनी स्थिर नटली सुरनाथवरा!
नच आतां ती इतरा नवरी कदा ॥१॥

**दरबारीः**—साम्राज्याधिपति रावणमहाराजांचा जयजयकार असो!

**रावणः**—आज आम्हीं साम्राज्याधिपति झालों, म्हणून तुम्हीं जो आमचा जयजयकार चालविला आहे, तो ऐकून आम्हांला पराकाष्ठेचा आनंद वाटतो. आम्हीं जगद्विख्यात असा पराक्रम गाजवून सर्व देवलोक धुळीस मिळविला. तेथील अलोट संपात्ति लुटून आम्हीं आपल्या लंकेंत आणली. आणि यमकुबेरादि सर्व राजांना आम्हीं आपल्या बंदिशाळेंत घालून त्यांच्या नशिबाच्या कवटीवर ‘ गुलामगिरी ’ हीं पांच अक्षरें आम्हीं आपल्या पराक्रमानें कायमचीं खोदून ठेविलीं आहेत. अशा प्रकारें विजयी होऊन आम्हीं आज सम्राट झालों—आम्हीं आज राजाधिराज झालों. आजचें आमचें वैभव पाहून मोठ्या डौलानें भूमंडलाला प्रदक्षिणा घालणारा सहस्ररश्मि मध्यान्हीं आल्यावर क्षणभर स्थिर होईल. आणि—आमच्या या ऐश्वर्या-सारखें ऐश्वर्य आजपर्यंत त्याला कधींच पहायला मिळालें नसल्यामुळें—हें सर्व ऐश्वर्य पाहतांच त्याला मोठा विस्मय वाटेल व शेवटीं लाजेनें खालीं

मान घालून तो मोठ्या कष्टानें अस्ताला जाईल.

**दरबारी**:—साम्राज्याधिपति रावणमहाराजांचा जयजयकार असो!

**रावण**:—राजे, महाराजे आणि अधिराजे हो! ब्रह्मलोकचा ब्रह्मदेव, कैलासलोकचा कैलासनाथ आणि इंद्रलोकचा इंद्र इत्यादि राजांनीं ज्याप्रमाणें आमची साम्राज्यसत्ता मान्य करून वररूपानें खंडणी देण्याचें कबूल केलें, त्याचप्रमाणें आर्यावर्तांतील राजे जनक आणि दशरथ या वृद्ध कपींना आम्हीं आपली सत्ता मान्य करायला लावली, कीं त्रैलोक्याधिपति म्हणून तुम्ही आमचा असाच जयजयकार कराल आणि आम्हींहि तो मोठ्या आनंदानें ऐकूं.

**दरबारी**:—साम्राज्याधिपति रावणमहाराजांचा जयजयकार असो!

**रावण**:—परशुरामानें एकवीस वेळ आर्यक्षत्रियांचा संहार करून आर्यावर्त दुर्बल केला आहे. त्या दुर्बलतेचा फायदा घ्यावा म्हणून मारीचादि आपले सेनानी आम्हीं आर्यावर्तावर पाठविले होते. पण त्यापूर्वींच विश्वामित्रासारख्या ब्रह्मर्षींनीं आत्मज्ञानानें आमची महत्त्वाकांक्षा व आमचें भावी धोरण ओळखून आमच्या विरुद्ध आर्यजनतेचीं मनें तयार करण्याकरितां यज्ञसमारंभाला सुरुवात केली. या यज्ञाची पूर्तता होऊं नये म्हणून आमच्या शूर वीरांनीं शक्य तितके आटोकाट प्रयत्न केले. पण विश्वामित्रानें—पूर्वाश्रमांतील क्षात्रविद्येच्या या आद्यप्रवर्तकानें—दाशरथि वीरांना—त्या कोंवळ्या पोरांना—क्षात्रविद्येंत प्रवीण करून आमच्या सेनासागराचा धुव्वा उडविला आणि आपला यज्ञ रक्षण केला. या वेळीं आम्हीं व्यक्तिशः देवलोकावरील स्वारींत गुंतलों होतों, म्हणून विश्वामित्राकडे फारसें लक्ष देतां आलें नाहीं; पण आतां प्रसंगानुसार या गोष्टीचा विचार करून आर्यावर्त आमच्या साम्राज्यांत—या विश्वव्यापी साम्राज्यांत—अंतर्धान पावला आहे, असें तुमच्या लवकरच नजरेस येईल.

**दरबारी**:—साम्राज्याधिपति रावणमहाराजांचा जयजयकार असो!

**गवालाक्ष**:—महाराज! आर्यावर्ताच्या बाबतींत आपणांला आतां विचार करण्याचें कारणच नाहीं. कारण, राजा जनकांनीं धनुष्याला प्रत्यंचा चढविण्याचा पण जाहीर केला आहे. हा पण जिंकण्याकरितां मी जाणार

असून पण जिंकल्यावर मिळणारें जनकराज्य अनायासेंच महाराजांचें आहे. महाराज! खोटें सांगत नाहीं, तो पण मी खात्रीनें जिंकीन. कर्पूर! तीं धनुष्यें आण पाहूं इकडे. ( कर्पूर धनुष्य घेऊन येतो ) पहावें. मीं इतक्या धनुष्यांना प्रत्यंचा लावली आहे, मग पण कसा जिंकणार नाहीं ?

**रावणः**—( थोडें हंसून ) गवालाक्षराय! ही तुमची कृति जरी थोडी हास्यास्पद असली, तरी तुमच्यांत इतका उत्साह या वृद्धापकाळीं देखील आहे हें पाहून आम्हांला मोठें समाधान वाटलें. ज्या धनुष्याला प्रत्यंचा चढविण्याचा पण म्हणून राजा जनकानें जाहीर केला, तें भार्गवरामाचें शिवधनुष्य होय. हें धनुष्य सामान्य वीराला उचलणें शक्य नाहीं. हें धनुष्य उचलून दाखविणें, म्हणजे त्रैलोक्यांत बलवान् ठरण्यासारखें होय. देवलोक जिंकूनहि सर्व जगाला जो आमच्या पराक्रमाचा व सामर्थ्याचा दरारा बसला नसेल, तो परशुरामाच्या शिवचापाला नुसत्या वांकविण्यानें बसणार आहे. तें चाप आम्हीं वांकविल्यावर आर्यावर्त सहजच आमच्या छत्राखालीं येईल; आणि विश्वामित्र—जो क्षात्रविद्येच्या प्रसारार्थ अहोरात्र झटत आहे, तो देखील—अनायासेंच निराश आणि कर्तव्यविन्मुख होईल. अशा रीतीनें या पणावर बऱ्याच राजकीय घडामोडी अवलंबून आहेत. म्हणून आम्हीं राजा जनकाच्या पाचारणावरून मुद्दाम या पणाच्या समारंभाकरितां जाणार आहोंत. तुम्हां प्रजाजनांना तें शिवचाप यःकश्चित् धनुष्याप्रमाणें वाटत असल्यामुळें आणि आमच्या राजनिष्ठ प्रजेंतील उत्साह हीच आमची शक्ति होय, अशी आमची प्रबल भावना असल्यामुळें तें सामर्थ्यवान् चाप आमच्याच पुढें नम्र होईल, इतरांपुढें शक्य नाहीं, असा आमचा विश्वास दुणावत चालला आहे.

**दरबारीः**—साम्राज्याधिपति रावणमहाराजांचा जयजयकार असो !

**दैत्यगुरुः**—साम्राज्याधिपति रावणमहाराज! आम्हां दैत्यांची सत्ता आपण आज अबाधित केली म्हणून, या दैत्याचार्यांच्या गादीवरून आपणांला मी शतशः धन्यवाद देतों. व्यष्टिरूप सत्तेची परमावधी करून भौतिक सुखाचें एकछत्री साम्राज्य सर्व जगावर प्रस्थापित करणें हें दैत्यसंस्कृतीचें ध्येय आपण पूर्णतेला आणलें, याबद्दल मी आपलें सर्वांतर्फे अभिनंदन

करितों. देवदैत्यांचा कलह म्हणजे आधिदैविक व आधिभौतिक तत्त्वांतील वाद होय. देवलोक जिंकून देवगुरु बृहस्पति आणि देवेंद्राच्या दरबारांतील बुध, शनि आदिकरून सर्व नवपंडित यांना आपण कैद करून आणल्यामुळें, आज भौतिक तत्त्वाचा पूर्ण विजय झाला असें मला वाटतें. महाराज! आपण दैत्यसंस्कृतीच्या प्रसारार्थ अद्‌भुत पराक्रम तर गाजविलाच; पण त्याबरोबरच वेदांचीं दहा खंडें करून दैत्यसंस्कृतीचीं प्रमेयें आपण आपल्या अतुल बुद्धिमत्तेनें व असामान्य विद्वत्तेनें सिद्ध करून दाखविलीं, म्हणून आजच्या विजयोत्सवाच्या दरबारांत आपणाला इतउत्तर 'दशमुखी' या विद्वत्तादर्शक पदवीनें सर्वांनीं संबोधावें असें मी आचार्य या नात्यानें जाहीर करीत आहें.

**दरबारीः**—साम्राज्याधिपति रावणमहाराजांचा जयजयकार असो!

**दैत्यगुरुः**—परंतु, या पदवीदानाला संमति द्यावयाला बृहस्पतीखेरीज इतर पंडित कारागृहांत असल्यामुळें जरी हजर नसले, तरी देवगुरूनींच या पदवीला आपली संमति दर्शवावी म्हणजे हें पदवीदान सार्थ होईल.

**रावणः**—देवगुरु मोठ्या आनंदानें आपली पसंती दर्शवितील. देवगुरु बृहस्पते! आमच्या पदवीदानाला संमति द्या.

**दैत्यगुरुः**—संमति दिल्यावर देवगुरूंचा देवेंद्राच्या दरबारांत होता त्यापेक्षां अधिक मोठा मान या दरबारांत खात्रीनें राहील.

**रावणः**—करा, देवगुरो! आपलें मत लौकर जाहीर करा.

**मंदोदरीः**—देवगुरूंना कशाला ही तसदी देतां?

**रावणः**—नाहीं; त्यांची संमति मिळालीच पाहिजे. काय अद्याप आपण स्वस्थच बसलां? ही देवेंद्राची आज्ञा नव्हे, ही या लंकाधीशाची आज्ञा आहे, एवढें लक्षांत आणून बोला लौकर! कां नाक मुरडून तोंड कां फिरविलें? या मुखांतून शब्द निघाल्यावर तो अमान्य करण्याची छाती प्रत्यक्ष देवेंद्राची नाहीं; मग देवगुरूचा काय पाड?

**बृहस्पतिः**—आपल्या प्रश्नाला उत्तर द्यावें अशी माझी इच्छा नाहीं. आणि मला वाटतें माझ्याकडून उत्तर मिळावेंच असा आपण आग्रहहि करूं नये.

**रावणः**—नाहीं! उत्तर मिळालेंच पाहिजे! हा आमच्या इच्छेचा दरबार

आहे; तुमच्या इच्छेचा नव्हे! आमच्या दरबारांत तुम्ही आमच्या आज्ञेचे गुलाम आहां. तेव्हां येथें–या आमच्या दरबारांत–तुम्हीं आमची आज्ञा मान्य केलीच पाहिजे. म्हणून म्हणतों कीं, आमच्या पदवीदानाला संमति द्या. बोला लौकर!

**बृहस्पतिः**––मग उत्तर हेंच कीं, अगाध विद्वत्तेबद्दल दैत्यगुरूंकडून जी पदवी लंकाधीशाला अर्पण करण्यांत आली, त्या पदवीला लंकाधीश मुळींच पात्र नाहीं–लायक नाहीं!

**रावणः**––काय? लायक नाहीं? (सिंहासनावरून खालीं उतरतो) बृहस्पते! तूं या वेळीं या लंकाधीशाच्या दरबारांत आहेस. लंकाधीशाचा दरबार म्हणजे घटापटाचा कीस पाडणाऱ्या पंडितांच्या हातांतील बाहुलें असणाऱ्या देवेंद्राचा दरबार नव्हे. येथें आमच्याविरुद्ध एक शब्द जर तुझ्या मुखावाटें अधिक बाहेर पडला, तर तुझें डोकें धडापासून वेगळें होईल. तेव्हां पुनः विचार करून उत्तर दे.

**बृहस्पतिः**––मुखावाटें एकदां शब्द बाहेर पडला. आतां हें डोकें धडापासून वेगळें होवो किंवा या शरीराचे तुझ्याकडून वाटेल तसे धिंडवडे निघोत. पण या देवगुरूची जिह्वा एकच वाणी बोलणार! विद्वत्तेबद्दल मिळालेल्या 'दशमुखी' या पदवीला तूं मुळींच पात्र नाहींस–लायक नाहींस!

**रावणः**––पुनः तेंच! बृहस्पते! लंकेशाच्या दरबारांत तुझा हा उद्दामपणा क्षणभरहि चालणार नाहीं. ज्याच्या चिरंजीवानें तुमच्या देवेंद्राला अमरावतीच्या सिंहासनावरून भर दरबारांत खालीं पाडला आणि इंद्राणीचा पदर ओढून तिला टाहो फोडायला लावला, व आमची सत्ता मान्य करणें भाग पाडलें, त्या या लंकाधीशाच्या दरबारांत तुझ्या विद्वत्तेचा ताठा क्षणभरहि चालणार नाहीं. देवेंद्राची सत्ता आणि लक्ष्मी ज्या अर्थी आमच्या चरणीं लीन झाल्या आहेत त्या अर्थी देवगुरूची विद्वत्ता देखील आमच्या चरणीं नम्र झालीच पाहिजे.

**बृहस्पतिः**––तुझ्या पराक्रमाला अगर कावेबाजपणाला भिऊन देवेंद्राची सत्ता आणि लक्ष्मी या दोन चंचल वृत्तींच्या गंगा–यमुना तुझ्याकडे वळल्या असतील; पण विद्वानाची निस्पृहता–ही ध्रुवाची स्थिर व उज्वल चांदणी

पृथ्वीवर केवढेहि मोठे उल्कापात झाले तरी आपल्या स्थानावरून भ्रष्ट होत नाहीं. विद्वानाची निस्पृहता सत्तेची दास बनत नसते; तर ती सत्तेलाच पाहिजे तिकडे गति देत असते.

रावणः—कोण कोणाला गति देतो याचें तुला आतांच प्रत्यंतर दाखवितों. बोल! आमच्या पदवीदानाला संमति देतोस कीं नाहीं?

बृहस्पतिः—नालायकाच्या पदवीदानाला कोणता निस्पृह विद्वान् आपली संमति देणार ?

रावणः—अरे! या हरामखोराला बांधा; याचे डोळे फोडून त्यांच्या खांचा करा; याच्या अंगाचीं सालडीं काढून त्यांतून निघणारें रक्त याला प्राशन करायला लावा. आमची पदवी कबूल करीपर्यंत याचे पाहिजे तितके हाल करा. पण तोंपर्यंत याचा प्राण मात्र जातां कामा नये.

बृहस्पतिः—माझ्या डोळ्याच्या खांचा करा, अंगाची सालडीं काढून त्यांतील रक्त मला प्राशन करायला लावा, पण एकदां माझ्या मुखांतून निघालेला शब्द मी कधींहि—प्राणांतींहि—बदलणार नाहीं.

रावणः—फोडा! या हरामखोराचे डोळे येथें माझ्यासमोर फोडा!

मंदोदरीः—म्हटलें—देवगुरु बृहस्पतींची अशी अवहेलना करूं नये. हे मोठे विद्वान आहेत. विद्वानांचा शाप घेऊन आपण आपल्या सार्वभौम सत्तेला व वैभवाला कीड लागूं देऊं नका.

रावणः—मंदोदरी! विद्वानांचें वर्चस्व देवमंदिरांत चालेल; पण राजदरबारांत चालणार नाहीं. भर दरबारांत बृहस्पतींनीं आमचा हुकूम अमान्य करून जो आमचा अपमान केला आहे, त्याबद्दल बृहस्पतीला योग्य शासन केलेंच पाहिजे. शासन नकोच असेल तर आमचा शब्द अमान्य केल्याबद्दल बृहस्पतींनीं आमची क्षमा मागावी व आमच्या पदवीदानाला संमति द्यावी; त्याशिवाय याची सुटका होणें शक्य नाहीं.

बृहस्पतिः—शरीराच्या सुखाकडे पाहून भलत्याच गोष्टीला मान तुकविणारा मी नव्हें! जेथें विद्वत्ता वास करीत असते—खऱ्या विद्वत्तेनें जें अंतःकरण संस्कृत झालें असतें, तें अंतःकरण मृत्यूला भिण्याइतकें व शरीराच्या सुखाला भुलण्याइतकें नेभळें नसतें. देवलोकावर विजय संपादून

तूं आज गर्विष्ठ झालास खरा; पण हें लक्षांत ठेव कीं, या गर्वाबरोबरच गर्वभंगाचें साधनहि निर्माण झालें आहे. ईश्वरी सृष्टींत वाईट वस्तूंबरोबरच त्यांच्या प्रतिकाराचीं साधनें सुद्धां जन्माला येत असतात.

**रावणः**—माझा प्रतिकार ! माझा प्रतिकार करण्याची शक्ति कुणांत आहे ? देवेंद्रांत आहे—का ब्रह्मयांत आहे—का कैलासनाथांत आहे ? तुझ्या वाणींत आहे असें जर तुला वाटत असेल, तर सर्पाच्या तोंडाप्रमाणें तुझें तोंड ठेंचायला काय उशीर आहे ?

**बृहस्पतिः**—तुझा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य आज देवेंद्रादिकांच्या शस्त्रास्त्रांत नसलें तरी परशुरामाच्या शिवचापांत आहे हें खास.

**रावणः**—काय ? परशुराम मला शत्रु होईल, असें तुला वाटतें ? त्याचें धनुष्य वांकविणारा जर आर्य क्षत्रिय असला तर तो त्याच्यावर शस्त्र उचलणार आहे, आमच्यावर नाहीं; आम्ही तें धनुष्य वांकवून त्याचे तुकडे केले तरी तो आमच्यावर रुष्ट होईल, अशी आम्हांला मुळींच भीति वाटत नाहीं. आणि झालाच तरी त्याची घमेंड जिरविण्याइतकें आमचें मनगट खंबीर आहे.

**बृहस्पतिः**—ज्या सहस्रार्जुनानें आपल्या बायकांचें तुला दास्य स्वीकारायला भाग पाडलें तो महान् पराक्रमी सहस्रार्जुन, जेव्हां ब्राह्मण्याला कस्पटाप्रमाणें लेखूं लागला, तेव्हां त्याला व त्याच्या सहस्र वीर पुत्रांना, जें धनुष्य हातांत घेऊन परशुरामानें धारातीर्थीं लोळविलें, तें सामर्थ्यवान् शिवचाप तुझ्यापुढें नम्र होणें शक्य नाहीं; तर तेंच तुला आपल्यापुढें नम्र करील अशी माझी मनोदेवता मला साक्ष देत आहे.

**रावणः**—तुझ्या मनोदेवतेची साक्ष काय कामाची ? शिवधनुष्याल नमविण्याचें सामर्थ्य या मनगटांत आज आहे, ही [illegible] साक्ष.

**बृहस्पतिः**—तुझ्या मनगटांत किती सामर्थ्य आहे हें अजमावून पाहण्याची जबाबदारी ब्रह्मर्षि विश्वामित्रांनीं घेतली आहे. तेव्हां तें चाप कोण वक्र करील याचें प्रत्यंतर तो ब्रह्मर्षि तुला लवकरच आणून देईल.

**रावणः**—विश्वामित्राची काय प्राज्ञा आहे ? त्या संन्याशाला, दिसतांच कीटकाप्रमाणें चिरडून टाकीन ! परशुरामाचें चाप वांकविण्याचा उत्साह

ज्या अर्थी माझ्या प्रजेंत आहे त्या अर्थी तें माझ्याचपुढें नम्र होईल; इतरांपुढें शक्यच नाहीं.

**बृहस्पतिः**—तुझ्या प्रजेंत उत्साह आहे, हा तुझा निवळ भ्रम आहे. तुझी प्रजा चैनी झाली आहे. चैनी लोक प्रसंगीं उत्साहाच्या गोष्टी बोलत असतात. पण त्या पोकळ उत्साहाला बळी पडून गर्व बाळगणारा तुझ्या-सारखा काळाच्या दाढेंत पाऊल टाकीत असतो. आणि अशा रीतीनें ज्याचें पाऊल काळाच्या दाढेंत पडत आहे, त्याच्यापुढें हा देवगुरु बृहस्पति आपला माथा नम्र करील हें कल्पान्तींहि घडणें शक्य नाहीं.

**रावणः**—तर मग सांगितलेली शिक्षा कायम झाली. अरे! प्रथम याचे दोन्ही डोळे येथल्या येथें फोडा. ( शिपाई तरवारी काढतात. )

**बृहस्पतिः**—माझें शरीर तुझ्या ताब्यांत आहे, म्हणून त्यावर तुला हुकूम चालवितां येईल. पण माझी सदसद्विवेकबुद्धि अद्याप तुझा गुलाम झाली नाहीं व तूं माझे केवढेहि भयंकर हाल केलेस तरी होणार नाहीं. माझ्या हालअपेष्टेंतच तुझा विनाशकाल आहे आणि त्यांतच सत्याच्या दिव्य व अद्भुत शक्तीचें बीज आहे. म्हणून हा देवगुरु बृहस्पति पाहिजे तितके हाल सहन करीत आनंदानें मरेल. पण तुझी व्यर्थ स्तुति करून आपली शुद्ध जिह्वा कधींहि विटाळून घेणार नाहीं.

**रावणः**—शिपाई! अगोदर याची जीभ छाटून काढा. ( शिपाई तसें करूं लागतात. )

**मंदोदरीः**—शिपायांनो! थांबा. तसें कांहीं करूं नका. महाराज! विद्वा-नाशीं हट्ट धरून त्याच्यावर कोपूं नका. बृहस्पतीसारखा निःस्पृह विद्वान् जगतावर एकच असतो. पण त्याच्या एका शब्दांत हजारों महारथ्यांपेक्षां अधिक सामर्थ्य असतें. निःस्पृह विद्वानाचा शब्दच न्यायनीतीचें उगम-स्थान होय. म्हणून म्हणते कीं, हजारों रथी महारथी धुळीस मिळवा; पण एकहि विद्वान् दुखवूं नका.—करा—देवगुरूंना सोडून देण्याचा हुकूम करा.

**रावणः**—दरबारी कारस्थानांत स्त्रियांनीं ढवळाढवळ करूं नये. भर दरबारांत आमच्या शब्दाचा उपमर्द करणाराला जर आम्हीं सोडून दिलें तर आम्ही सत्ताधीश ते कसले?

**मंदोदरीः**—महाराज ! सत्ताधीशानें ईश्वर आणि निःस्पृह विद्वा यांच्याशीं नमून असावें, म्हणजे सत्तेचा पाया मजबूत होतो, असें मला वाटतें.

**रावणः**—नाहीं ! ईश्वराला, विद्वानाला–सर्वांना–आम्हीं आपल्या हुकुमाच्या सूत्रांनीं खेळविणारे देवांचे देव आहों.

**मंदोदरीः**—नाहीं; महाराज ! असें म्हणून चालणार नाहीं. कारण, इतकें अबाधित स्वातंत्र्य आजपर्यंत कोणालाच उपभोगतां आलें नाहीं–येत नाहीं–व पुढेंहि येणार नाहीं. स्वातंत्र्य झालें तरी त्याला मर्यादा आहेच. सत्य, न्याय, नीति व धर्म या चतुष्कोणाच्या आंत स्वातंत्र्याची मर्यादा आंखलेली आहे. ही मर्यादा ओलांडून स्वातंत्र्यसिंधु अमर्याद झाला कीं क्षणार्धांत त्याला शोषण करणारा अगस्ति निर्माण झालाच म्हणून समजा. याकरितां या सर्वसाक्षी परमेश्वराची—

**रावणः**—परमेश्वराची ? परमेश्वर हा एक कल्पनेचा बाऊ आहे. त्याला भिण्याइतका मी खुळा नाहीं. सज्जलीस ?

**मंदोदरीः**—महाराज ! परमेश्वर जरी बाऊ असला, तरी तो अनावर मनाची मर्यादा बांधणारा आहे. त्याच्या काल्पनिक अस्तित्वामुळेंच धर्माची, नीतीची, न्यायाची व सत्याची प्रस्थापना झाली आहे. परमेश्वराच्या काल्पनिक अस्तित्वानेंच मानवांत मानवपण आलें आहे; नाहीं तर मनुष्य आणि पशु यांत भेदच राहिला नसता; मानवांचें श्रेष्ठत्व स्थापन करण्याकरितांच समाजशास्त्र्यांनीं ईश्वर, कल्पनेचाच कां म्हणाना, पण गृहीत धरिला आहे. तेव्हां त्याला भिऊनच पाऊल टाकलें पाहिजे. नाहीं तर...

**रावणः**—नाहीं तर काय ? (शिपायांना उद्देशून) चला. आमचा हुकुम लागलीच अमलांत आणा.

**मंदोदरीः**—नका ! महाराज, मी आपल्या पायां पडतें. बृहस्पतींना दुखवूं नका. त्यांचे हाल करूं नका. त्यांच्या हातांतच पर्यायानें आपला नाश आहे. महाराज ! ही पहा आपल्या नाशाची ती उग्र देवता माझ्या दृष्टीसमोर उभी राहिली ! ती मला निक्षून सांगते कीं, मंदोदरी ! आपल्या पतीला काळाच्या दाढेंतून मागें ओढ. महाराज ! देवगुरूंना सोडून द्या एवढी माझी प्रार्थना आपण मान्य कराच.



मंदोदरी:—आपल्या नाशाची ती उग्रदेवता माझ्या दृष्टीसमोर उभी आहे. [ पृ. २६

**रावणः**—कोठें आहे ती उग्र देवता ? दाखीव मला. तिला लाथेखालीं तुडवून टाकितों. ( शिपायांना ) चला, पाहतां काय ?

**मंदोदरीः**—थांबा ! महाराज, आपण या देवगुरूंचे असे हाल करूं नका, त्यांना पाहिजे तर बंदिशाळेंत घाला, पण सुरक्षित ठेवा. निदान एवढी प्रार्थना तरी ऐका. येऊं द्या; महाराज ! माझ्या या करुणेनें तरी आपल्या अंत:करणाला थोडा द्रव येऊं द्या ! महाराज ! आपण या वेळीं दयार्द्र झाल्या-वांचून मी आपले पाय सोडायची नाहीं.

**रावणः**—ऊठ; मंदोदरी तूं भोळी आहेस. तुझ्याकरितां--केवळ तुझ्याच शब्दाकरितां—आम्ही या बृहस्पतीला सौम्य शिक्षा सांगतों. ज्या ज्या वेळीं आम्हीं या सिंहासनावर आरूढ होत जाऊं त्या त्या वेळीं या सिंहा-सनाची पहिली पायरी म्हणून बृहस्पतीच्या पाठीवर पाय देऊन चढत जाऊं !

[ जातो. ]

**बृहस्पतिः**—माझ्या पाठीवर पाय देऊन सिंहासनावर चढ अगर डोक्यावर पाय देऊन सिंहासनावर चढ ! पण, हें लक्षांत ठेव कीं, ज्या या सिंहासनावर तूं माझ्या पाठीवर पाय देऊन चढणार तें हें तुझें सिंहा-सन परशुरामाच्या शिवचापाला प्रत्यंचा चढविणारा वीर उलथून पाडील, आणि तुझा विध्वंस करून तुझ्या बंदिशाळेंतील तेहतीस कोटी देवांची मुक्तता करील.

**मंदोदरीः**—देवगुरूंची ही शापवाणी !

[ पडदा पडतो. ]

---

# द्वितीयकाण्ड

## चित्र पहिलें

मिथिला—बगीचा

जानकी:—

गीत अकरावें ( चाल–उन्मादें भीति भारी० )

चपला ही घाली माला ।
दयाळा सुशामा घनाला ॥ ध्रु० ॥
हा उपकारक वीर सुधीर जनां ।
देई जला शुभ काला ॥ १ ॥

जनतेवर परोपकार करण्याकरितां अवतरलेल्या या वधूवरांची या नील-वर्ण गालिच्यावरून ही वरातच निघाली असें माझ्या मनाला कां वरें वाटतें ? ( आकाशाकडे पहात उभी राहते. )

चंद्रानना:—अग, वर काय पाहतेस ? तुला प्रेमाचा धडा शिकायचा आहे ना ? मग त्या कमलिनीकडे पहा—

गीत बारावें ( चाल–कालि बदरिया० )

बाला प्रणयाची कमलिनी ।
काया वाही ही अलिचरणीं ॥ ध्रु० ॥
प्रेमभरें त्या ठेवी हृदयीं ।
स्वदला ही उमलोनि बहुपरी ॥ १ ॥
मधु देवोनि पुष्ट त्या करी ।
जललीला ही त्यासवें करी ॥ २ ॥

जानकी:—प्रेम—शुद्ध प्रेम—ज्याला दिव्य प्रेम म्हणतात, तें त्या बिचारीला ठाऊकच नाहीं. त्याचा हिला अनुभवच आलेला दिसत नाहीं.

**चंद्रानना:**—म्हणजे ?

**जानकी:**—चंद्रानने ! भ्रमर हा हिचा प्रियकर नव्हे; तर ही रसभरित झाल्यावर म्हणजे ही तारुण्याच्या भरांत येऊन हिनें आपली प्रेमदलें विकसित केल्यावर मकरंदप्राशनार्थ हिच्यावर बलात्कारानें हल्ला करणारा तो चोर होय. तसें जर नसतें तर, भ्रमर आंत प्रवेश करितांच आपल्या प्रेममंदिराचीं दारें—आपलीं कोमल दलें—बंद करून त्याचा हिनें खून पाडलाच नसता. आणि काय म्हणून खून करूं नये ? स्त्री जातीची कोमल खरी; पण भ्रमरासारख्या दुष्टाकडून जेव्हां तिच्यावर असह्य जुलूम होतो आणि अब्रू भ्रष्ट होण्याचा प्रसंग येतो, तेव्हां कोमलपणांतूनच निष्ठुरता निर्माण होते व ती जुलमाचा प्रतिकार करिते.

**चंद्रानना:**—अस्सें अस्सें ! तर मग ही कमलिनी प्रणयिनी नसून खुनी आहे म्हणायची.

**जानकी:**—होय. भ्रमरासारख्या पाप्यानें जसें हिचें सत्त्व हरण केलें तसेंच पाप्याचा नाश करण्याकरितां हिला खुनी बनावें लागलें. शेवटीं खऱ्या प्रेमाचा एकीह शब्द हिच्या कानावर आला नाहीं. बाई ! ही कमलिनी म्हणजे जन्माची विरहिणी !

**चंद्रानना:**—मग शुद्ध प्रेम आहे तरी कुठें ?

**जानकी:**—प्रेमाचें—शुद्ध प्रेमाचें—उदाहरण पहायचेंच असेल तर बाई चंद्रानने ! जरा वर पहा. मृगनक्षत्र जवळच आल्यानें आकाशांत हे मेघ जनतेवर उपकार करण्याकरितां आक्रमण करूं लागले आहेत. आणि ह्या विद्युल्लता—त्यांच्या धर्मपत्न्या त्यांच्या जगत्कल्याणाच्या कार्याला मदत करण्याकरितां त्यांच्याबरोबर संचार करूं लागल्या. कर्तव्यतत्परतेनें जेथें दोन जीव बांधले जातात, तेथेंच खरें प्रेम असतें, याची ह्या विद्युल्लतांना जाणीव झालेली दिसते.

**गीत तेरावें** ( चाल—दुर्ती नसे ही माला० )

**समजुनी वदते तुला । स्वार्थ नसे प्रेमाला ॥ ध्रु० ॥**

प्रणयिनी–गंगा सोडी धारा । जेथें नसे फलकांक्षा ॥ १ ॥
अशा निरभिलाष वृत्तींनेंच ह्या विद्युल्लता आपल्या प्रियकरांच्या सहधर्मचारिणी झाल्या आहेत. यालाच खरें प्रेम म्हणतात.

**चंद्रानना**:—तुझें चित्त रामप्रतिमेकडे वेधलें असल्यामुळें त्या प्रतिमेशीं ज्या ज्या वस्तूंचें साम्य असतें ती ती वस्तु तुला प्रेममय भासते, आणि इतर त्याज्य वाटतात.

**जानकी**:—कां वाटूं नये ?

**चंद्रानना**:—मेघांच्या सहवासांत जशी विद्युल्लता शोभते तशीच श्याम वर्ण रामाच्या सहवासांत तूं शोभशील; पण–

**जानकी**:—इतकें चांगलें गोड बोललीस आणि ' पण ' काय ?

**चंद्रानना**:—तुझ्या स्वयंवराकरितां तुझ्या बाबांनीं लावलेला पण नाहीं कां लक्षांत ?

**जानकी**:—माझ्या स्वयंवराकरितां पण ! बाबांनीं माझ्या स्वयंवराकरितां पण लाविलाच नाहीं ?

**चंद्रानना**:—का विसरली होतीस वाटतें ही एवढी मोठी गोष्ट ?

**जानकी**:—रामप्रतिमेच्या सहवासांत मला ह्या पणाचें भानच नव्हतें; पण ! चंद्रानने ! माझ्या स्वयंवराकरितां पण; त्या घोर पणाची आठवण झाली कीं त्या कमलिनीचें चरित्र मूर्तिमंत डोळ्यांपुढें उभें राहतें. जुलमी भ्रमरानें हल्ला केल्यामुळें त्या दुर्दैवी कमलिनीची झालेली दुर्धरावस्था पहा ! प्रेम–शुद्ध प्रेम–असें म्हणत ही अखेर प्राण सोडील; पण बिचारीला प्रेमाचा एकहि शब्द ऐकायला मिळणार नाहीं. बाबा ! पण–पण कशाकरितां जाहीर केला ? शिवधनुष्याला प्रत्यंचा चढविणें म्हणजे भार्गवरामाला निस्तेज करणें होय. सुकुमार रामचंद्राला हें शक्य आहे काय ?

गीत चवदावें ( चाल--स्वमना करा विशाला० )

पण हा कसा मनाला । बहु लावितो कसाला ॥
भालीं कुणी न धरिला । रविचा टिळा विशाला ॥ ध्रु० ॥
अनला गणोनि सुसुधा । सेवोनि कोण धाला ? ॥
पण जिंकण्यास धजतो । नर कोण याच काला ? ॥ १ ॥

**चंद्रानना**:—( स्वगत ) हिला थोडें चिडवावेंच आतां. ( उघड ) एवढा पण कुणीच जिंकणार नाहीं, अशी भिती बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं तुला. पण जरी भयंकर आहे, तरी मी खात्रीनें सांगतें कीं, तुला कांहीं कुंवार राहण्याचा प्रसंग येत नाहीं.

**जानकी**:—कोण ? पण जिंकायला असा समर्थ कोण आहे ? रामचंद्रजी पण जिंकतील असा तुला विश्वास वाटतो काय ?

**चंद्रानना**:—त्यांना जरी जिंकितां आला नाहीं, तरी पृथ्वीच्या पाठीवर तुला आणि पणाला जिंकणारा असा एक महावीर आहेच. त्याची राणी झाल्यावर साऱ्या त्रैलोक्याची तूं स्वामिनी होशील.

**जानकी**:—रामाशिवाय कोण आहे ग असा ?

**चंद्रानना**:—रागावूं नकोस आतांपासूनच. तूं जरी आम्हांला विसरलीस, तरी आम्ही तुझें कल्याणच चिंतणार ! माझी देवाजवळ तर हीच प्रार्थना आहे कीं,

गीत पंधरावें ( चाल—करीना वश कुणा )

**लाधो पति तुला गोजिरा ।**
**भाग्यवान रावण राणा ॥ ध्रु० ॥**

**जानकी**:—चल ! तुझ्या सहवासाला क्षणभरहि उभें राहूं नये.

( जाऊं लागते )

**चंद्रानना**:—( तिचा हात धरून ) ऐकून तर घ्या बाईसाहेब ! अशा रागावतां कां आतांपासूनच ?

**ठेवो तळहातीं कोमला ।**
**जेंवि पुष्प बाला । नानाप्रणयसुख तें**
**तुजसवें मिळे फार त्याला ॥ १ ॥ लाधो० ॥**

**जानकी**:—पण हें लक्षांत ठेव कीं,

गीत सोळावें ( चाल—थोर रण मातृपद )

**राम मम विश्वास-जाण बल त्यांस तें ।**

भयद पण तो वारी भज वरी भासते ॥ ध्रु० ॥
आत्म-विश्वास हा होय आत्माराम ।
देइलच आराम तो राम मातें ॥ १ ॥ (जाते)

**चंद्रानना:**—रागावलीच ही! थट्टेंत देखील रामाचा उपहास हिला सहन होत नाहीं. विश्वासाच्या जीवनांतून उद्भवलेला प्रेमाचा अंकुर असाच बलवत्तर होत जाणार! देवा! माझ्या सखीची इच्छा परिपूर्ण कर! (जाते)

---

## चित्र दुसरें.

लंका—गवालाक्षाचा वाडा.

(गवालाक्ष हातरुमालानें वारा घेत प्रवेश करितो)

**गवालाक्ष:**—अरे कर्पूर! कर्पूर!

**कर्पूर:**—(प्रवेश करून) महाराज! स्वामिन्! आपल्या चरणाच्या अत्यंत प्रामाणिक व आज्ञाधारक अशा या नम्र सेवकाला काय आज्ञा आहे?

**गवालाक्ष:**—'काय आज्ञा आहे!' पुन्हा–पुन्हा म्हण पाहूं म्हणालास तें!

**कर्पूर:**—(हात जोडून 'महाराज' पासून 'आज्ञा आहे' पर्यंत पुन्हा म्हणतो.)

**गवालाक्ष:**—शाबास! आतां खरा नम्र सेवक झालास. इतकी लीन भाषा इतक्या लवकर कसा रे शिकलास? आहेस, एकूण गुलामगिरीला लायक आहेस.

**कर्पूर:**—हा दयावंत महाराजांच्या अन्नाचाच गुण आहे. आपण घालीत असलेल्या पौष्टिक अन्नाचें रक्त अंगांत भिनलें कीं, जीभ अशी मिठास होते कीं काय सांगू? महाराज! या अन्नामुळें जीभ जशी बदलते, तसेंच मनहि बदलतें. आणि त्याबरोबरच मनुहि बदलेला आहे कीं काय असें वाटतें! हा महाराजांच्या अन्नाचाच गुण.

**गवालाक्ष**:—आहेस, पदरीं ठेवायला लायक आहेस. चाकरानें असेंच प्रामाणिकपणानें वागलें पाहिजे. जा, पलीकडच्या दिवाणखान्यांतून दोन वेत्रासनें व एक स्थंडिल इकडे घेऊन ये. येथें जरा हवा थंड आहे.

**कर्पूर**:—आज्ञा शिरसावंद्य महाराज! (जातो.)

**गवालाक्ष**:—(स्वगत) कालच्या दरबारांत रावणमहाराजांनीं माझा उत्साह मारून टाकिला. हीं मोठीं माणसें असेंच गोड बोलून दुसऱ्याचा केसानें गळा कापत असतात; आणि आपला स्वार्थ साधत असतात. सहज राज्य मिळविण्याचा प्रसंग हा–होय; नुसती धनुष्याला प्रत्यंचा चढवून राज्य आणि बायको मिळविण्याचे असले प्रसंग वारंवार येत नसतात. कधीं काळीं आलेला हा कपिलाषष्ठीचा योग आहे; पण इतकीं राज्यें मिळविलीं, इतकी मुबलक संपत्ति मिळविली, तरी महाराजांची वैभवलालसा कांहीं कमी झाली नाहीं. हें जनकराज्य मला मिळवितां आलें, तर महाराजांना केवढें भूषण! तें कांहीं नाहीं. आपण तर महाराजांबरोबर मिथिलेला जाणार, आणि संधि साधून सर्वांच्या अगोदर उठणार, आणि जनकराज्य व जानकी मिळविणार! मी राजा झालों म्हणजे महाराज माझें काय करणार आहेत म्हणा! (कर्पूर वेत्रासनें व स्थंडिल आणून ठेवितो. त्यावर बसून) कर्पूर! अरे कर्पूर!

**कर्पूर**:—दयाळू महाराजांची या नम्र व प्रामाणिक सेवकाला काय आज्ञा आहे?

**गवालाक्ष**:—अरे! असा भितोस कां? इकये ये. असा माझ्याजवळ ये. हें पहा कर्पूर! जरा विनय बाजूला असूं दे. क्षणभर आपलें धनी–चाकराचें नातें विसरून जा.

**कर्पूर**:—बरें, विसरलों.

**गवालाक्ष**:—मी तुला कांहीं विचारणार आहें. अगदीं नाजूक आहे. कर्पूर! माझा तुझ्यावर विश्वास असल्यामुळें–इतकेंच नव्हे, तर तूं माझा कलिजा असल्यामुळेंच मी तुला मिथिलेला स्वयंवरपणाकरितां बरोबर घेणार आहें. माझ्याजवळ परका भाव नाहीं. मी तुला असें विचारतों–पण काय रे! तुझ्या बाईसाहेब कोठें गेल्या?

**कर्पूरः**—बाईसाहेब ! बाईसाहेब पोषाख चढवून धवलाक्षाबरोबर फिरायला–सहज सहल करायला–गेल्या आहेत.

**गवालाक्षः**—काय म्हणतोस, धवलाक्षाबरोबर ? कुणाहि बरोबर फिरायला जायचें झालें, तरी माझ्या आज्ञेवांचून बाहेर पडायचें नाहीं म्हणून तिला मीं अनेकदां सांगितलें होतें.

**कर्पूरः**—नाहीं, चूक झाली. आज्ञा घेण्याचा विसर पडला !

**गवालाक्षः**—काय ?

**कर्पूर**—नाहीं; मला वाटलें माझ्यावरच रागावलां कीं काय !

**गवालाक्षः**—कुणाला विसर पडला ?

**कर्पूरः**—मला–नाहीं–म्हटलें बाईसाहेबांना आपली आज्ञा घेण्याचा विसर पडला असेल. त्यांचा स्वभाव भोळसर आणि विसराळू आहे; पण त्या तशा प्रामाणिक आहेत. सरकारांनीं रागावूं नये.

**गवालाक्षः**—काय ! ती विसराळू आणि भोळसर ?

**कर्पूर**—होय. फारच विसराळू. त्या कधीं कधीं घरालाच विसरतात! प्रत्यक्ष सरकारांना देखील एकादे प्रसंगीं विसरतात! भोळा स्वभाव–भोळ्या स्वभावांत सर्वव्यापकता असते. त्यांचें सर्व मनुष्यजातीवर समान प्रेम आहे. फारच प्रामाणिक !

**गवालाक्षः**—असला विसराळूपणा आणि भोळसरपणा मला नको आहे. तिला कायमचीच सोडचिठ्ठी दिली पाहिजे. कर्पूर! मी तुला असं विचारतों–समज–मला पण नाहीं जिंकतां आला, तरी त्या मिथिलानगरींतून एकादी सुंदर पत्नी तूं मला मिळवून दिली पाहिजेस. कारण, त्या फार पतीआज्ञांकित निघतात. महाराणी मंदोदरीमाईसाहेब ह्या आर्यावर्तांतलि असल्यामुळें पतिआज्ञांकित आहेत. त्यांच्यांत कांहीं दोष आहेत–दोष तसे मोठेसे नाहींत–असले तरी त्यांच्या मुळाशीं पतिनिष्ठा–पतिहित–असल्यामुळें त्यांच्यापासून रावणमहाराजांना एक प्रकारचें मोठें सुखच होत आहे.

**कर्पूरः**—स्वामिन् ! त्या पतीवर प्रेम करणाऱ्या निघतात हें खरें; पण एककल्ली असतात. अशीलामाईप्रमाणें त्यांच्यांत सर्वव्याकपत्व नसतें.

**गवालाक्षः**—जळों तें सर्वव्यापकत्व ! मला आतांपर्यंत चार बायका

होऊन गेल्या, त्या सर्वजणींनीं माझ्याशीं काडीमोड केली. ही आतां या उतार वयांतली पांचवी आहे. ही माझ्याशीं काडीमोड करील किंवा मला तरी सोडचिठ्ठी द्यावी लागेल, असा प्रसंग आहे. मग कसें काय ? मिळेल का तिकडे एखादी बायको ?

**कर्पूरः**—आपण तिकडे गेल्यावर याचा विचार करूं.

**गवालाक्षः**—मी अगदीं कंटाळलों बाबा ! नाना प्रकारच्या विचारांनीं तिनें माझ्या डोक्यांत काहूर माजवलें आहे. त्यापेक्षां असें केलें तर नाहीं चालणार कां रे ? एखाद्या मुलीचा होतकरू बाप व होतकरू आई गांठावी, आणि त्यांच्या भावी मुलीची मागणी करावी. त्या गर्भांशींच वाग्निश्चय करावा. म्हणजे तिला लहानपणापासूनच्च माझ्या मर्जींत वागायची संवय लागेल. अशी लग्नाची पद्धत आहे का रे कोठें ?

**कर्पूरः**—असली पद्धत कोठें असेल ती असो ! पण काय हो महाराज ! गर्भाशीं वाग्निश्चय केल्यावर त्यांतून मुलगी न प्रसवतां मुलगा प्रसवला तर मग कोणी कोणाची बायको व्हावें ?

**गवालाक्षः**—होय, हा प्रश्न मात्र बिकट आहे. मग असें करूं, जेथें नुकतीच मुलगी जन्माला आली असेल, असें एखादें द्रव्यलोभी दरिद्री कूळ गांठून तिला विकत घेऊं. कसंहि कर, पण पतिआज्ञांकित आणि सुंदर, अगदीं चित्रासारखी रेखाटलेली बायको मिळवून दे बाबा !

**अशीलाः**—( पडद्यांतून ) कशाला ? ( प्रवेश करून ) चित्रासारखी रेखाटलेली बायको कशाला ?

**गवालाक्षः**—यावें, बसावें माझ्या प्रियकरणीनें ! ( तिला स्वागतपूर्वक बसवितां.) म्हटलें काय हवें माझ्या प्रियसुंदरीला ? हें विनंतिपूर्वक विचारायला कृपाळूपणानें परवानगी मिळेल काय ?

**अशीलाः**—कसली बायको रे कर्पूर ?

**कर्पूरः**—होय. ती आपली--(बोलूं नको म्हणून गवालाक्ष खुणेनें सांगतो.)

**गवालाक्षः**—माझ्या प्राणप्रियेची स्वारी आज कोणीकडे आणि कुणाबरोबर सहल करायला गेली होती ? माझ्या विचारण्यापासून होणाऱ्या तसदीची माफी असावी.

अशीलाः—कर्पूर ! माझ्या प्रश्नाचें उत्तर दे अगोदर.

कर्पूरः—बाईसाहेब ! ( बोलूं नको म्हणून गवालाक्ष खुणेनें सांगतो. )

गवालाक्षः—फिरण्यापासून माझ्या या नाजूक प्राणाला फार त्रास झाला असेल नाहीं बरें ?

अशीलाः—कर्पूर ! माझ्या प्रश्नाचें उत्तर देतोस कीं नाहीं ?

कर्पूरः—होय, देतों बाईसाहेब !

गवालाक्षः—कर्पूर ! गद्ध्या ! पुढें जाऊन फराळाची तयारी करून ठेवायला सांग. माझ्या या सुकुमार प्राणेश्वरीला झालेले श्रम तुला दिसत नाहींत ? जा लौकर. [ कर्पूर जातो.]

अशीलाः—पण माझ्या प्रश्नाला—

गवालाक्षः—माझ्या लाडक्या प्रियकरणीच्या प्रश्नाला मींच उत्तर देतों. चित्रासारखी रेखाटलेली बायको मिळवून दे असें जें मीं म्हटलें त्याचा अर्थ असा कीं, माझ्या या लावण्यसंपन्न छबीइतकी छबी तुमच्या मिथिलेंत असेल तर मिळवून दे पाहूं ! माझी खात्री आहे कीं, इतकें सुंदर रत्न मिथिलेंत तर मिळायचेंच नाहीं. हातच्या कांकणाला आरसा कशाला ? मी महाराजांबरोबर उद्यां किंवा परवां मिथिलेला जाणार आहें, तेव्हां दिसेलच प्रत्यक्ष !

अशीलाः—खरेंच का ?

गवालाक्षः—खोटें नाहीं. त्याशिवाय उगीच कां मीं हें असलें अप्रतिम रत्न माझ्या प्रेमकोंदणांत बसविलें ?

अशीलाः—आजचे माझे नूतन मित्र धवलाक्षरायहि असेंच म्हणाले.

गवालाक्षः—(स्वगत) त्या हलकट धवलाक्षानें तुझ्या या वरपांगींच्या नखऱ्याला भुलून नसत्या सौंदर्याचें वर्णन तुला खूष करण्याकरितां केलें असेल आणि मी तरी पण जिंकून येईपर्यंतच तुझी आर्जवें करणार ! होय.- असेंच खरें. सर्वांच्या अगोदर उठून प्रत्यंचा चढवावी आणि पण जिंकावा हाच निश्चय !

अशीलाः—हा नवीन जोडा चांगला शोभतो का माझ्या पायाला ?

गवालाक्षः—फारच सुंदर ! सुंदरांचें सर्वच सुंदर ! खोटें नाहीं. हा

लुसलुशीत गुलाबी गाल असा तोडून टाकावा असें वाटतें. गालाकडेच दृष्टि फेंकावी तों हे पाणीदार काळे भोर नेत्र संतापून कटाक्षबाण फेंकतात. नेत्रांचेंच अवलोकन करावें तों हा विशाल भालप्रदेश रागानें आंठ्या घालतो. भालप्रदेशाकडेच नजर द्यावी तों हें चाफेकळीसारखें सुंदर नाक क्रोधानें फणफणूं लागतें. नाकाकडेच पहावें तों हे नाजूक बिंबोष्ठ मत्सरानें चिडून कंपायमान होतात. अधरांचेंच यथेच्छ पान करावें तों मन्मथराजाच्या विजयध्वजावर आरूढ झालेली ही गरुडाची जोडी आपल्या तीक्ष्ण चोंचीचा या हृदयावर मारा करिते. ( अशीला आनंदानें खुलून आलिंगन देते. ) अरे कर्पूर ! फराळाची तयारी झालीना ?

**कर्पूरः**—( प्रवेश करून ) होय दयावंत !

**गवालाक्षः**—चल–हें सामान उचलून ठेव !

**कर्पूरः**—आज्ञा मान्य महाराज !

**गवालाक्षः**—हळूहळू चलावें आतां ! (अशीला व गवालाक्ष जातात.)

**कर्पूरः**—( वेत्रासनें व स्थंडिल उचलून ) सौंदर्याच्या खोट्या वर्णनाला बाईसाहेब भाळल्या आणि बाईसाहेबांपुढें धनीसाहेब थंड पडले ! हे म्हणे शिवधनुष्याला प्रत्यंचा चढविणार ! सारा वेड्यांचा बाजार–दुसरें काय ! तर्कवितर्क काढून नेभळे लोक घरांत बसूनच ह्या अशा शौर्याच्या गोष्टी बोलत असतात ! ( जातो. )

---

## चित्र तिसरें

### लंका–रावणाचें विलासमंदिर

मंदोदरी चिंतायुक्त बसली आहे

**रावणः**—( प्रवेश करून ) मंदोदरी! कालपासून तुझ्या मनाला त्या वाचाळ बृहस्पतीच्या भविष्याची सारखी हुरहुर लागलेली दिसते. म्हणूनच ना तूं अशी खिन्न असतेस ?

**मंदोदरी**:—होय. तेव्हांपासून भवितव्यता माझ्या दृष्टीसमोर उभी आहे. माझें ऐकणार का आपण ? देवगुरु बृहस्पतीची—इतकेंच नव्हे, तर देवेंद्राच्या दरबारांतील बुध शनि आदिकरून सर्व नवपंडितांची—मुक्तता करा आणि त्यांच्याबरोबरच, तेहतीस कोटी देवांचीहि मुक्तता केली, तर भावी आपत्ति सहजच टळेल.

**रावण**:—हं! वेडी कुठली ! अग कसली आपत्ति आणि कसली भवितव्यता! शेषाच्या मस्तकावर ज्याप्रमाणें पृथ्वी स्थिर झाली आहे, त्याच-प्रमाणें माझ्या इच्छेवर व शब्दावर त्रैलोक्यांतील सर्व राजांचीं सिंहासनें अधिष्ठित झालीं आहेत. शेषानें जर आपल्या मस्तकाचा आधार काढून घेतला, तर पृथ्वी जशी रसातळाला जाईल, तद्वतच माझ्या मुखांतून शब्द निघतांच त्रिभुवनांतील सर्व राजांचें राजमुकुट धुळीला मिळतील. असा माझ्यासारखा सामर्थ्यवान् वीर आपत्तीला किंवा भवितव्यतेला थोडाच भीक घालणार आहे ! ही खिन्नता सोडून दे. उगीच मनाला हुरहुर वाटूं देऊं नकोस. बरें; आज तूं नक्षी काढलेला शेला मला अर्पण करणार होतीस तो कोठें आहे ? हं ! आण पाहूं. सर्व दगदगींतून मुक्त होऊन स्वस्थ चित्तानें आज तुझ्या मंदिरांत यायला मिळालें. ( मंदोदरी जाते ) भोळसर कुठली ! क्षत्रियांत क्षात्रतेज निर्माण करूं इच्छिणाऱ्या विश्वामित्राचा मिथिलेला जातांना वाटेंत शोध लावितों आणि सांपडतांच कोणाच्याहि नकळत होता कीं नव्हता असें करून टाकतों. त्याला नष्ट केल्यावर माझ्यावांचून कोण प्रत्यंचा चढविणार आहे ? आणि मग मला विरोध करणारा असा प्रतिपक्षी तरी कोणता पुढें येणार आहे ?

**मंदोदरी**:—( हातांत शेला घेऊन प्रवेश करिते ) हा घ्यावा ( शेला अंगावर घालते. )

**रावण**:—मंदोदरी ! या उष्ण काळांत अंगावर शेला घेण्याची जरूरी नाहीं हें खरें. पण ह्या तुझ्या हातच्या शेल्यांतील तंतूंनीं माझे हातपाय बांधून मला असें जखडून टाकिलें आहे, तरी यांत आनंदच वाटतो. कारण, या प्रेममंदिरांत येऊन तुमचा बंदिवान झाल्यावर तुमच्या इच्छेविरुद्ध वाग-ण्याची आम्हां वीर पुरुषांची छातीच होत नाहीं.

**मंदोदरी**:—आमच्या इच्छेनें आपण चालणार, आणि आपण आमचे बंदिवान ! शक्यच नाहीं.

**रावण**:—यांत अशक्य काय आहे ? मी खोटें सांगत नाहीं. शत्रूशीं लढतांना स्फुरण पावणारे आमचे बाहू येथें आले असतां तुमच्या आलिंगनाकरितां आतुर होतात. रणांगणांत एकमेकांशीं झुंज खेळणारे हे बेटे दंत आणि ओष्ठ आपसांतील द्वैत विसरून तुमच्या चुंबनाकरितां थैमान घालितात. शत्रूला खदिरांगारासारखे भासणारे हे आमचे नेत्र शांत होऊन तुमच्या मुखचंद्राचें दर्शन घेण्याकरितां अगदीं स्थिर वृत्ति धारण करितात. हें सर्व तुमच्या इच्छेप्रमाणेंच घडतें ! तसें जर घडलें नसतें–स्त्रियांच्या बंदिशाळेंत यायला आम्हीं पुरुष जर नादान ठरलों असतों–तर त्या बेट्या ब्रह्मयाची ही सृष्टि ओसाडच पडली असती !

**मंदोदरी**:—खरेंच; आपण म्हणतां तसे वीर पुरुष जर आपल्या पत्नीच्या अधीन असतेच, तर धर्माचरणाविरुद्ध—

**रावण**:—आमच्याकडून पाऊल पडलें नसतें असेंच ना ? मंदोदरी! या रंगेल विषयांतून भलताच विषय काढून या वेळीं रंगाचा बेरंग करूं नकोस. धर्माच्याच गप्पा तूं या वेळीं झोंकणार कीं नाहीं ? त्या धर्माला मी कंटाळलों. सर्व धर्मशास्त्रें मीं पालथीं घातलीं. धर्माच्या साऱ्या बाता झूट आहेत. धर्म हा शरीरानें आणि मनानें दुबळ्या असणाऱ्या लोकांकरितां आहे, आमच्याकरितां नाहीं. पापपुण्याची भीति बाळगून नसत्या शाब्दिक कल्पनांना महत्त्व देऊन त्यांत दुबळ्या लोकांनीं आनंद मानावा. पण धर्म हा आमचा बंदा गुलाम आहे. आमच्या हातांतील तें एक बाहुलें आहे. आमच्या इच्छेनें तो जन्माला येतो, व आमच्या इच्छेनेंच त्याचा लय होतो. मी म्हणतों, आम्ही आचरूं तो धर्म आणि आम्ही बोलूं तें धर्मवाक्य. आमच्यासारखा कर्तबगार वीर धर्म निर्माण करितो, पण धर्माचा गुलाम होऊन राहात नाहीं. सांग धर्म धर्म ही काय चीज आहे ? तो कर्तबगार पुरुषानेंच निर्माण केला कीं नाहीं ?

**मंदोदरी**:—महाराज, आपल्या मनाला वाईट वाटूं नये म्हणून अधिक बोलतां येत नाहीं. पण कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक होणें, म्हणजे तींत

नाशाचें बीजारोपण होण्यासारखेंच आहे. फळ पिकलें म्हणजे त्याचें पतन होतेंच. सूर्य मध्यान्हीं येतांच त्याच्या अस्ताला सुरुवात होते.

**रावण**:—पण मंदोदरी, मी सूर्यहि नव्हे व फळहि नव्हे. म्हणून मला अस्त नाहीं व लयहि नाहीं.

**मंदोदरी**:—पण खरें सुख आपणाला त्यांत मिळणार नाहीं. कारण स्वतः-च्या ऐषआरामाकडे, स्वतःची मनमुराद चैन भागविण्याकडे आपण आपल्या कर्तबगारीचा व पराक्रमाचा उपयोग न करितां, जनतेच्या सुखाकडे आणि पतित आत्म्यांच्या उद्धाराकडे उपयोग केला, तर चिरकालिक अशा दैवी सुखाची आपणाला जोड मिळेल. मग आपल्या मुखांतून निघालेला सहज शब्द धर्माज्ञा म्हणून सारें जग शिरसावंद्य मानील. कालाच्या अनंत गतीशीं टक्कर देऊन आपली वाणी जिवंत राहील. आज मात्र आपण सत्ताधीश आहां म्हणून आपली आज्ञा मान्य होते. पण ह्या सत्तेचा पाया कालगतीनें ढांसळल्यावर आपल्या शब्दाला कोण जुमानणार आहे?

**रावण**:—पुरें कर आतां हें धर्माचें चऱ्हाट! फारच लांबलें. येथें तूं धनी व मी गुलाम असें तुझें व माझें नातें आहे. तेव्हां धन्यानें गुलामांना धर्मबिर्म सांगत बसूं नये. म्हणून म्हणतों कीं, ही धर्माची रडकथा पुरे कर. आणि चांदण्यांत मौज मारण्याकरतां चल.

**मंदोदरी**:—मीं इतकी काकुळतीनें बोललें; पण आपण सारें थट्टेवर नेलेना!

**रावण**:—थट्टा! थट्टा ही काय चीज आहे बुवा? बायका म्हणे प्रेमांत आल्या म्हणजे पुरुषांची थट्टा करून त्यांना रंगांत आणत असतात. तेव्हां सांग–सांग पाहूं थट्टा कशी असते ती? कां बोलत कां नाहींस?

**मंदोदरी**:—काय बोलूं? माझें बोलणें नकोसें होतेंना?

**रावण**:—नाहीं, तुझें बोलणें नकोसें होत नाहीं; तर तूं जें तत्व-ज्ञान सांगतेस, तें मात्र नकोसें होतें. तुझी वाणी बृहस्पतीपेक्षां गोड खरी; पण मनुष्याची वाणी गोड असली, म्हणजे त्यानें वाटेल तो कंटाळवाणा विषय घेऊन त्यावरच चऱ्हाट वळूं नये. प्रसंगाला साजेसा विषय घेऊन नियमित पण थोडक्यांत बोलणें हेंच उत्तम वक्त्याचें लक्षण. साखर गोड




रावणः—काय ? प्रदर्शन पुरें झालें म्हणतेस !

[ पृ. ४१

म्हणून कोणी यथेच्छ भक्षण केली तर जाचक होतें. तुला बोलायचेंच असेल तर थट्टेवर दे पाहूं व्याख्यान! बोल! बोल! काय तूं बोलत नाहींस? समजलों. थट्टा कशी असते हें शब्दानें व्यक्त होण्यासारखें नाहीं, म्हणून ती कृतीनें दाखविण्याकरितां तूं ही मौनवृत्ति धारण केली असावीस! मग मीहि असा उभा राहून तूं खुलें केलेलें हे थट्टेचें प्रदर्शन असें बघणार (तिच्याकडे पहात उभा राहतो) हं चढीव भिंवया. अशाच आणखी वर चढीव! अहाहा! काय बेट्यांची मजेदार धनुष्याकृति झाली ही! पुरे; पुरे करा आतां हा मारा. मी अगदीं जर्जर झालों! महाराणीसरकारांना शरण आहें. म्हटलें आपल्या सामदामाच्या सर्व अटी मला मान्य आहेत. (मंदोदरी हंसते) हं! हंस! अशीच हंस! पण थांब; कोणी पहात तर नाहींना हें तुझें हसणें? नाहीं. कोणी पहात नाहीं. कारण, चंद्राला पाहून विकास पावणाऱ्या कमलिनीच्या दृष्टीला जर हें तुझें हास्य पडलें, तर तिला देखील लाज वाटेल. स्फटिकाप्रमाणें चमकणारी ही दंतपंक्ति पाहून चंद्रासभोंवतीं आनंदानें क्रीडा करणारा तारागण लाजेनें एकाद्या काळ्याकुट्ट मेघाचा आश्रय करील.

**मंदोदरी**:—(लाजून) काय हें?

**रावण**:—प्रभातकाळच्या बालरवीच्या नजरेला जर या वेळची ही तुझ्या गुलाबी गालावर नाचणारी लाली दिसली, तर तो देखील लाजेनें पुन्हा अस्ताला जाईल. पण हंस! अशीच हंस आणखी! कारण, हा प्रभात काळ नव्हे; आणि चंद्रोदयाचा समय असला तरी आपण आपल्या मंदिरांत आहों. तेव्हां हंस!

**मंदोदरी**:—पुरें नाहीं का झालें?

**रावण**:—काय? प्रदर्शन पुरें झालें म्हणतेस? हो झालें खरें पूर्ण! हें प्रदर्शन पाहण्याकरितां पहाना प्रेक्षकांच्या कशा उड्यावर उड्या पडत आहेत. माझे हात, पाय, नेत्र, दंत आणि ओष्ठ हीं सारीं प्रतिष्ठित आणि संभावित प्रेक्षक मंडळी आतां एकदम या प्रदर्शनांत उडी घेणार! (दोघेहि एकमेकांना आलिंगन देतात) थट्टा करून स्त्रिया पुरुषांना कशा खुलवितात हें आपल्याला आतां चांगलें समजलें!

**मंदोदरी**:—शर्थ झाली बाई! पुरुषापुढें कीं नाहीं बायकांनीं काय बोलावें;

**रावण**:—बोल! बोलायला मनाई नाहीं; पण या वेळीं तत्त्वज्ञान नको. विद्वान् जोडपें असलें म्हणजे त्यानें नेहमीं क्लिष्ट विषयावरच संभाषण केलें पाहिजे असा कांहीं निर्बंध नाहीं. बाहेरच्या दगदगींतून मुक्त होऊन पति-राज मंदिरांत परत आल्यावर विद्वान् स्त्रीनें अशा प्रणयचेष्टा करूनच त्याला रंजविलें पाहिजे. पुरुष विद्वान् स्त्रीचा अभिलाष करितात, तो तिच्या जवळून तत्त्वज्ञान शिकण्याकरितां नाहीं. तर सुधारलेल्या प्रणयाचा उपभोग घेण्याकरितांच! चल आतां आपण बागेंत जाऊं! [ जातात. ]

---

## चित्र चवथें

### आर्यावर्त–मिथिलेच्या वाटेंतील जंगल.

( राम व लक्ष्मण प्रवेश करितात )

**लक्ष्मण**:—दादा, माझ्या मनांत चारपांच दिवसांपासून आपल्याला एक गोष्ट विचारायची आहे. कामिनी देवीचा छळ करणाऱ्या चंडांश-दैत्याला गुरुजींनीं देहान्तशासन न सांगतां त्याचें नाक व कानच कापायला सांगितले याचा अर्थ काय? अशा दुष्टाला देहान्तप्रायश्चित्तच द्यायला पाहिजे होतें.

**रामचंद्र**:—नाहीं, लक्ष्मणा, गुरुजींनीं त्याला जी शिक्षा सांगितली तीच योग्य आहे. अशा दुष्टांना एकदम ठार करण्यापेक्षां त्याच्या हयाती-पर्यंत लक्षांत राहील असें प्रायश्चित्त देऊन त्याला झुरत मरूं देणें हेंच अधिक श्रेयस्कर! यांत दोन गोष्टी साध्य होतात; एक, ज्याची त्याला जन्मभर आपल्या दुष्कृत्यांची आठवण राहते. व दुसरी, दुसऱ्याला देखील त्याची ती स्थिति पाहून दुर्मार्गाकडे वळूं नये म्हणून वचक बसतो. तेव्हां—

गीत सतरावें ( चाल—माता दिसली समरीं० )

**आज्ञा दिधली गुरुनीं समजुनी ।**
**काय गणिसी विफलाच मनाशीं ? ।। ध्रु० ।।**
**भास्कर झाला लज्जित ज्यांच्या ।**
**पाहुनी अतितर घोर तपासी ।। १ ।।**

अशा तपस्व्याची ती आज्ञा आहे, समजलास ? बरें ! लक्ष्मणा, गुरुजी स्नान करून माध्यान्ह संध्येला बसतील, तेव्हां तूं आतां त्यांच्याकडे जा !

**लक्ष्मणः**--आणि आपण ?

**रामचंद्रः**—रावण आज विमानांत बसून मिथिलेला जाण्याकरितां निघाला, असें गुरुजींनीं आत्मज्ञानानें जाणलें आहे. तेव्हां ऋषिमंडळांनीं चालविलेल्या यज्ञकर्मांना कदाचित् तो विघ्न करील, म्हणून त्याच्या विमानाची टेहळणी करावी अशी मला गुरुजींनीं आज्ञा केली आहे. याकारितां मी या समोरच्या टेंकडीवर बसतों. संध्या आटोपून गुरुजी जेव्हां मार्गस्थ होतील, तेव्हां तुम्हीं याच वाटेनें या; म्हणजे आपण पुढें चालूं लागूं.

**लक्ष्मणः**—दादा, गुरुजीकडे आपण जा, लंकाधीशावर मी नजर ठेवतों ! या प्रवासांत आपण थकलां ! आपली प्रकृति फार क्षीण झाली, म्हणून आपण हा त्रास घेऊं नका ! मला आज्ञा करा ! आपलें कार्य मी खात्रीनें पार पाडीन.

**रामचंद्रः**--लक्ष्मणा, लहानांचा उत्साह थोरांच्या थकलेल्या वृत्तीला उत्तेजन देत असतो. या प्रवासानें थकलेलें हें माझें शरीर तुझा हा उत्साह पाहूनच पुन्हा ताजेतवानें झालें आहे. खरे क्षत्रिय—सत्याचे व धर्माचे पुरस्कर्ते असे वीरपुरुष—शरीरानें कितीहि शिणलेलें असले तरी मनाच्या खंबीरपणामुळें पुष्ट शरीराच्या मत्तगजेंद्राला लोळवणाऱ्या पंचाननाप्रमाणें सदासर्वदा बलवान् असतात.

**लक्ष्मणः**—दादा, मी जरी लहान असलों, तरी त्या दैत्यांना हार जाण्याइतका खास दुर्बल नाहीं. सिंहाचा छावा कुत्र्याच्या भुंकण्याला भीक घालीत नसतो. मदोन्मत्त हत्तीचें गंडस्थल जो सहज लीलेनें फोडतो त्याला

या दैत्यांच्या मायावी कृतीचा समाचार घेतां येणार नाहीं काय ? आपण विश्रांति घ्यावी; आणि रावणाच्या विमानांची टेहळणी करण्याला मला आज्ञा द्यावी.

**रामचंद्रः**—लक्ष्मणा, या प्रवासामुळें मी थकलों असें का तुला वाटतें ? मग हा सूर्य कां थकला नाहीं ?

**गीत अठरावें** ( चाल—देवीच भासे० )

**केवीं न आला भानु श्रमाला ॥ भानु श्रमाला ।**
**तेजदान तो करीत फिरतां ॥ ध्रु० ॥**
**मार्गच दावी लोकवरा हा**
**असुख तें सुख गणी धर्मात्मा ।**
**जाण जसें हें वाण सतीला ॥ १ ॥**

**लक्ष्मणः**—दादा, या कल्पनेंतच आपल्याला आनंद मानावयाचा असेल तर खुशाल माना !

**रामचंद्रः**—ही कल्पना नाहीं; तर हें अबाधित सत्य आहे, ज्या पंचतत्त्वांचा आधार या सूर्याला आहे, त्याच पंचतत्त्वांचा आधार आपल्या या पंचप्रणांना आहे. मग एकानें अबाधित कार्य करीत असावें आणि दुसऱ्यानें थकावें याचें कारण काय ? सूर्य ईश्वर ! आपल्यापेक्षां अति श्रेष्ठ; आणि आपण मनुष्यप्राणी त्यापेक्षां अति दुर्बल ! अशी आपली कमकुवतपणाची भावना असते, म्हणूनच ना ? आम्हीं फार झालें, तर सूर्याच्या नांवाचा जप करीत असावें. पण नुसता त्याच्या नांवाचा जप करून स्वतःला कनिष्ठ रेखाटणें, हें कांहीं भक्तीचें साध्य नव्हे. भक्तीचें साध्य सेव्यसेवक या भावनेंत नाहीं, तर तें साम्यतेंत आहे. हा सूर्य तो मी व मी तो हा सूर्य अशी माझी भावना आहे. या भावनेनुसार सूर्याच्या अफाट कार्याचा एक कण जरी मला उचलतां आला, तरी मला माझ्या भावनेचें सार्थक झाल्यासारखें वाटेल. म्हणून मलाच जाऊं दे.

**लक्ष्मणः**—पण आपल्याला बरं वाटत नाहीं म्हणतांना ?

**रामचंद्रः**—लक्ष्मणा, तुझें प्रेम माझ्यावर खरें; पण तें माझ्या शरीरा-

वर आहे. हें शरीरावर प्रेम करायचं सोडून दे. प्रेम तत्त्वात्मक असावें. अशा तत्त्वात्मक प्रेमाला जाणणाऱ्या पुरुषांनीं वीराची प्रभावळ जेव्हां मंडित होते, तेव्हां त्याच्यापुढें सहस्ररश्मीसुद्धां निस्तेज पडतो. याकरितां गुरूला शिष्य असावा तर तो त्याच्या घरांतील पाणक्या किंवा नुसते हात-पाय चेपणारा नसावा. शिष्यवृत्तीचें एवढेंच लक्षण शिकविणारे ते गुरु नव्हत, आणि एवढ्याच वृत्तींत आनंद मानणारा तो शिष्यहि नव्हे. तुला गुरुशिष्याचें लक्षण पहावयाचेंच असेल तर—

गीत एकोणिसावें ( चाल—ललना खरी० )

नभ हा सखा । कसा लोककार्या ।
वाही सदा सुखदा स्वकाया ।। ध्रु० ।।
रविचंद्र जोडी । उद्योगकारी ।
त्या लाभली बलवान् ती ।
नित साधते ती नभसाध्य कार्या ।। १ ।।

[ पडद्यांत "धांवा हो धांवा" असा ध्वनि होतो. ]

**लक्ष्मणः**—दादा कसली ही ओरड ?

**रामचंद्रः**—कसली ओरड ही ! ( जरा पुढें होऊन ऐकतों तोंच पुन्हा ओरड होते. ) अरे, ऋषिमंडळाच्या यज्ञकर्मावर दैत्यांनीं हल्ला केलेला दिसतो. हे दैत्य या दाट मेघांचा आश्रय करून विमानांतून खालीं उतरले असावेत ! त्राटिकादिप्रमाणें यांचा फडशा उडविलाच पाहिजे. लक्ष्मणा, तूं जा गुरुजींकडे. मी या दैत्यांचा समाचार घेऊन येतों. प्रत्यक्ष लंकाधीश जरी उतरला असेल, तरी त्याला एका बाणानें यमलोक दाखवितों.

**लक्ष्मणः**—नाहीं. दादा, प्रकृतीच्या अशा अस्वस्थ स्थितींत मी आपणांला जाऊं देणार नाहीं. आपल्याऐवजीं मी जायला तयार आहे ना ?

[ पडद्यांत 'धांवाहो धांवा !' ]

**रामचंद्रः**—ऐक ! लक्ष्मणा, हा तपस्व्यांचा आर्तस्वर ऐक. सोड; मलाच जाऊं दे. भार्गवरामांनीं क्षत्रियांचा संहार केल्यामुळें क्षत्रिय वीर दुर्बल

झाले आहेत, अशा कल्पनेनें हे दैत्य तपस्व्यांवर पाहिजे तेव्हां हल्ले करितात, म्हणून क्षात्रिय वीर आज जीवंत आहेत–त्यांचें क्षात्रतेज अद्याप तेजोमय आहे; इतकेंच नव्हे, तर देवलोकावर विजय संपादून चढेल झालेल्या त्या दानवराजाला–त्या रावणालाहि लोळविण्याचें सामर्थ्य आज अयोध्येंतील वीरांत आहे, याचा प्रत्यय त्यांना आणून देतों. सोड रे, या प्रसंगीं मलाच जाऊं दे ! ( पुन्हा ओरड होते ) सोड रे बाबा!–तपस्व्यांनों, घाबरूं नका ! तुमच्या धर्मकर्माचें, तुमच्या हव्यकव्यांचें रक्षण करण्याकरितां हा रामचंद्र धांवून येत आहे. ( आवेशांत लक्ष्मणाला ओढीत नेतो. )

**लक्ष्मणः**—कांहीं झालें तरी प्राण धोक्यांत घालण्याकरितां मी आपल्याला पुढें पाऊल टाकूं देणार नाहीं.

**रामचंद्रः**—बंधू–माझा बंधूच–मला माझ्या कार्यांत अडथळा करीत आहे काय ? जीव, हा जीव कोणाचा ? हा जीव माझा नाहीं. लक्ष्मणा, तुझा नाहीं; माता कौसल्या हिचाहि हा जीव नव्हे ! हा जीव दीनांचा आहे, हा जीव पवित्र ब्राह्मणांचा आहे, हा जीव सत्याचा आहे; हा जीव धर्माचा आहे. तेव्हां तो त्यांच्याकरितांच अर्पण केला पाहिजे. म्हणून या वेळीं बंधूला, मातेला किंवा वडिलांना मी जुमानणार नाहीं. या वेळीं मला अडथळा करण्याकरितां प्राणापेक्षांहि प्रिय वाटणारे माझे गुरु वसिष्ठ व विश्वामित्र जरी आले, तरी त्यांचीहि आज्ञा या वेळीं मी मानणार नाहीं. या देहांत प्राण असेंपर्यंत, या इंद्रियांत चलनवलनशक्ति असेपर्यंत, हा रामचंद्र आपल्या धर्मबंधूनां, दुःखमुक्त करण्याकरितां, माता पिता, बंधू, व गुरु, हीं सर्व ऐहिकबंधनें अशीं ताडकन् तोडून टाकून धांवत जाणार ( लक्ष्मणाला लोटून धांवत जातो. ) ( लक्ष्मण मूर्छित होतो. )

**लक्ष्मणः**—( शुद्धीवर येऊन ) दादा, माझा दादा कोठें गेला ? या प्रवासांत माझी प्रकृति फार क्षीण झाली म्हणून काल म्हणालां ! आणि आज दैत्यकुंजरांवर एकाएकीं चालून जाण्याची शक्ति आपल्यांत कशी आली ? दादा कोणीकडे गेला ? या वाटेनें गेलां का ? ओरडहि कांहीं ऐकूं येत नाहीं, त्या अनुमानानें तरी जाईन म्हणतों. काय ? या वाटेनें तर दादा नाहीं गेला ? पण पाऊल, दादांचें पाऊल कुठें आहे ? अहाहा ! हेंच

दादाचें पाऊल ! याच–याच–वाटेनें दादा गेला. दादा, तुमच्या पवित्र चरणाची धूळ हा लक्ष्मण आपल्या मस्तकावर धारण करीत आहे ! पण धूळ फासून रहाणें हेंच कांहीं भक्तीचें–प्रेमाचें–बंधुप्रेमाचें लक्षण नव्हे, तर दादा जें कार्य करीत आहेत तेंच कार्य करणें हेंच खऱ्या श्रद्धेचें लक्षण ! असेंच दादा म्हणाले ! मग मी इथेंच स्त्रीप्रमाणें शोक करीत कसा बसूं ? शोक हा वीर पुरुषांना लांछनस्पद असतो. पवित्र कार्याकरितां लढतां लढतां मरणें हेंच वीराचें आदि कर्तव्य. (जातो.)

---

## चित्र पांचवें

### आर्यावर्त–ऋषींच्या पर्णकुटिका

(ऋषिमंडळापुढें रावणानें त्यांच्या यज्ञाचा विध्वंस करून विश्वामित्राचा गवती पुतळा उभा केला आहे असा देखावा.)

**रावणः**––ऋषींनो, तुमचा विश्वामित्र या वेळीं आमच्या समोर नाहीं, म्हणून त्याचा हा दर्भाचा पुतळा आणून तुमच्यापुढें उभा केला आहे. परशुरामाच्या शिवचापाला प्रत्यंचा चढविण्याची शक्ति रामचंद्रांत–त्या दशरथाच्या पोरांत–उत्पन्न व्हावी म्हणून यानेंच तुम्हांला यज्ञदेवतांना संतुष्ट करायला सांगितलें ना ? हा तुमचा विश्वामित्र प्रत्यक्ष जरी येथें नाहीं, तरी या दर्भाच्या पुतळ्याच्या रूपानें येथें आहे असें समजून आम्हीं त्याचे हाल करवून दाखवितों, म्हणजे तुम्हांला कार्यकारी व तेजस्वी वाटणारा हा तुमचा विश्वामित्र आम्हांला कसा तृणवत् वाटतो, याचें चित्र तुमच्या डोळ्यापुढें उभें राहील, आणि पणांत रामचंद्रालाच विजय मिळावा म्हणून तुम्ही चालविलेल्या देवांच्या याचना कशा फोल आहेत याचाहि तुम्हांला लौकरच अनुभव येईल.

**ऋषिमंडळः**—नारायण ! नारायण !

**रावणः**—अशा रीतीनें तुमच्या याचना फोल ठरल्याबर, तुमच्या नारायणाचा नारायण हा लंकाधीश होईल. आणि यज्ञसमयीं आहुती घेणाऱ्या सर्व देवतांचीं नांवें वगळून त्या सर्वांच्या ऐवजीं तुम्हांला आमच्या नांवानेंच आहुती द्यावी लागेल; तुम्हांला तुमच्या यज्ञाचें ध्येय बदलावें लागेल ! तुम्हांला तुमच्या वैदिक मंत्रांचीं पुनर्रचना करावी लागेल. मग तुमच्या विश्वामित्राला व त्याच्या शिष्याला—त्या रामचंद्राला—कोण विचारणार ?

**गवालाक्षः**—महाराज, आज्ञा करा. या गवती पुतळ्याचें शिर धडापासून वेगळें करूं का याचे डोळे फोडूं ? काय ? करूं तरी काय ? करा, आज्ञा करा लौकर ? पहा ! माझे बाहु स्फुरण पावूं लागले आहेत !

**रावणः**—ऋषींनो, तुमच्या विश्वामित्राला आम्ही दानव कसे कःपदार्थ समजतों, हें आमच्या सरदाराच्या आंगांत चढलेल्या स्फुरणावरून सहज दिसून येईल. बोलवा त्या विश्वामित्राला ! तो कुठें जवळपास असेल तर बोलवा ! म्हणजे त्यालाहि आपल्या भावी नाशाचें उग्र चित्र प्रत्यक्ष पहावयास मिळेल. म्हणून म्हणतों कीं बोलवा त्या विश्वामित्राला.

**विश्वामित्रः**—( प्रवेश करून ) विश्वामित्राला कशाला बोलवा ? हा पहा ! विश्वामित्र तुझ्यासमोर उभा आहे !

**रावणः**—ठीक झालें आलास ! तूं येथें आला नसतास तर तुझ्या भावी नाशाचें भेसूर चित्र या पुतळ्याचें हाल करून आम्हीं या ऋषिमंडळापुढें उभे करणार होतों. पण आतां तूंच आला आहेस.

**विश्वामित्रः**—काय ? तूं माझे हाल करणार ? खुशाल कर ! ज्या वैभवाचा मद चढून तूं इतका चढेल झाला आहेस, तें तुझें लंकेचें वैभव माझ्या गत साम्राज्याच्या नुसत्या पासंगालाहि पुरणारें नाहीं. अशा अवाढव्य साम्राज्याच्या वैभवाला कायमची लाथ मारून ज्यानें जगत्कल्याणार्थ—लोकसंग्रहार्थ—लोहपिष्ट भक्षण करून तपश्चर्या केली आणि विश्वपिता—जगत्सूत्रधार ज्यानें आपलासा केला, तो हा दैवी तेजाचा पुतळा विश्वामित्र तूं केलेल्या हालअपेष्टांना थोडाच भीक घालणार आहे !

**रावणः**—दैवी तेजाचा पुतळा ! तुझ्यासारखा दिवटा संन्याशी कसला

दैवी तेजाचा पुतळा ! आमच्या वैभवाचा अभिलाष धरून क्षत्रियांचीं पोरें जवळ बाळगतोस आणि त्यांच्या मनांत आमच्या विरुद्ध उठण्याची प्रेरणा करतोस हेंच काय संन्यासधर्माचें—ब्रह्मर्षिपणाचें—लक्षण ? सांग. हा धर्म कीं अभिलाष ?

विश्वामित्रः—अन्याय, अत्याचार, अभिलाष आणि अहंमन्यता या चार पायांवरच ज्याच्या धर्माची गायत्री उभी आहे त्यानें धर्म आणि न्याय असले पवित्र शब्द आपल्या जिव्हेनें उच्चारून कशाला भ्रष्ट करावेत ?

रावणः—विश्वामित्रा, धर्माधर्माची मीमांसा तूंच केली आहेस म्हणून घमेंड मारूं नकोस !

विश्वामित्रः—ठाऊक आहे ! वेदांचीं दहा खंडें केलीस म्हणून तुझ्या दरबारच्या मानडोलव्या पंडितांनीं तुला नुकतीच दशमुखी अशी बहुमानाची पदवी अर्पण केली आहे. पण तेवढ्यावरून तुला धर्म समजला, असें मी कधींहि म्हणणार नाहीं. तुला जर धर्म समजला असता, अखिल मानव-जातीचें हित करणारा असा विश्वव्यापी धर्म जर तुला समजला असता, तर सर्व देवादिकांना बंदिशाळेंत घालून त्यांच्या छातीवर नाचण्याची दुर्बुद्धि तुला झालीच नसती.

रावणः—देवादिकांच्या छातीवर जसा मी नाचतों, तसाच तुझ्याहि छातीवर नाचायला मी तयार आहें. पूर्वाश्रमांत गाजवलेल्या पराक्रमाच्या घमेंडीवर जर तूं क्षत्रियांत क्षात्रतेज प्रदीप्त करूं पहात असशील तर शस्त्र हातांत घे. तुझ्या पराक्रमाची घमेंड मी जिरवितों.

विश्वामित्रः—मी संन्याशी असल्यामुळें मला हातांत शस्त्र घेतां येत नाहीं. माझ्या हातांत जर शस्त्र असतें तर देवादिकांना बंदिशाळेंत घालून आमच्या धर्मकृत्यांना विघ्नें करायला व आम्हां तपस्व्यांचा छळ करायला तुम्हां दैत्यांची छातीच झाली नसती.

रावणः—ज्यानें त्रैलोक्य हालवून सोडलें, त्यानें विश्वामित्राचा पराक्रमहि सहज लीलेनें तुडविला असता. विश्वामित्रा, ज्याला तूं धर्मकृत्य धर्मकृत्य म्हणतोस, त्या कृत्याच्या मुळाशीं धर्म नाहीं; तर तुझें महत्त्वाकांक्षी अंतः-करण आहे. चतुर पुरुष आपलें महत्त्वाकांक्षी अंतःकरण उदात्त विचा-

रांच्या आवरणाखालीं झांकून टाकतात. आणि म्हणे धर्मकृत्य! कसलें रे धर्मकृत्य?

**विश्वामित्रः**—जशास तसें दिसलें तर मोठेसें नवल नाहीं; पण ब्रह्मर्षि अगर संन्याशी हा राज्यतृष्णेला किंवा कोणत्याहि ऐहिक वासनांना बळी पडत नसतो. त्याची ब्राह्मवृत्ति ही मानवी तेजस्वितेला घातक नसते, तर उत्तेजकच असते. या वृत्तीनें अमरत्वाची कल्पना दृढ होते. आणि असा अमर झालेला ब्रह्मर्षि राज्यतृष्णेनें क्षात्रवृत्ति उज्वल करीत नसतो, तर तो निष्काम बुद्धीनें तुझ्यासारख्या पाप्याला खरा धर्म शिकविण्याकरितां तिची संस्थापना करीत असतो. आणि तूं जो धर्माचा संहार चालविला आहेस, त्यापासून खरा धर्म रक्षण करीत असतो इतकेंच नव्हे, तर तुझ्यासारख्या गर्वांधाचें दैवी कल्याणहि तो इच्छित असतो.

**रावणः**—तुझ्यासारख्या फटिंगांनीं दुबळ्यांना धर्म शिकवावा आणि दुबळ्यांचेंच कल्याण चिंतावें! माझें कल्याण–माझा धर्म–माझ्या सामर्थ्यांत एकवटलेला आहे. विश्वामित्रा! हातांत स्मरणी घेऊन तिच्या जोरावर धर्माची प्रस्थापना होत नसते.

**विश्वामित्रः**—धर्मरूपी नारळावरील कवच असें क्षात्रतेज परशुरामानें नष्ट केल्यामुळें विश्वव्यापी धर्माला हतबल होण्याचा प्रसंग प्राप्त झाला खरा! पण ही दुर्बलता नष्ट करण्याचें सामर्थ्य ब्रह्मर्षींच्या हातांतील या स्मरणींतच आहे. धर्माची–खऱ्या विश्वव्यापी धर्माची–अशी विटंबना! दिवसा ढवळ्या त्याची अशी पायमल्ली! या सर्वांना कारण स्वजनविध्वंसक परशुराम! परशुरामा, हे कर्तव्यभ्रष्टा, धिक्कार धिक्कार असो तुला!

**परशुरामः**—(पडद्यांतून) विश्वामित्रा, कोणाचा धिक्कार करतोस?

**रावणः**—विश्वामित्रा, भार्गवरामासारख्या ब्राह्मणश्रेष्ठाला कर्तव्यभ्रष्ट म्हणतांना तुझी जिव्हा झडून कशी पडत नाहीं? पण नाहीं! ती जिव्हा उखडून बाहेरच काढली पाहिजे.

**विश्वामित्रः**—कांहींहि करा! पण माझ्यांत बोलण्याची शक्ति असेंपर्यंत मी परशुरामाला असेंच म्हणणार कीं,—

**परशुरामः**—(प्रवेश करून) काय म्हणणार? विश्वामित्रा, या परशुरामाला तूं काय म्हणणार?

**विश्वामित्रः**—तूं क्षत्रियांचा संहार केल्यामुळें विश्वव्यापी धर्माचा पाठिंबा नाहींसा झाला असें समजून हा दुरात्मा रावण यज्ञकर्मांचा—धर्माचरणाचा—निःशंकपणें विध्वंस करीत आहे. याला उन्मत्त करायला कारणीभूत तूं, असेंच मी म्हणणार !

**परशुरामः**—रावणानें कोणतें धर्माचरण नष्ट केलें? तुझ्या यज्ञांना विघ्नें आणलीं हेंच ना? पण हे तुझे यज्ञ धर्मयज्ञ नसून मी व रावण या आम्हां उभयतांविरुद्ध चालविलेल्या प्रयत्नांचे समारंभ होत !

**विश्वामित्रः**—माझे यज्ञ तुम्हांला कसेहि वाटोत; पण ते धर्मयज्ञ आहेत हीच गोष्ट खरी ! ब्राह्मवृत्ति ही क्षात्रवृत्तीला उद्दीपन करणारी देवता होय. आणि ह्या दोन वृत्ती संमेलित होऊन उन्नतावस्थेचा भानु जेव्हां मध्यान्हीं तळपूं लागतो, तेव्हांच वैश्यवृत्तीची सूर्यविकासिनी कमलिनी पूर्ण प्रफुल्लित होत असते. पण क्षात्रवृत्तीच्या अभावीं धर्माचा पांगळा झालेला रथ चालू करण्याकरितां—त्याला पूर्ववत तीन चक्रांची जोड देण्याकरितां—मी चालवलेल्या प्रयत्नांचें हे यज्ञ केंद्रस्थान होत !

**रावणः**—तूं ज्या वेळीं त्रिभुवनावर पराक्रमी म्हणून नांवाजला होतास, त्या वेळीं तुझी घमेंड जिरविणारा माझ्यासारखा वीर तुला प्रतिपक्षी मिळाला नव्हता; म्हणून त्या मदाच्या धुंदीनें तूं भ्रमिष्ट झाला आहेस.

**विश्वामित्रः**—म्हणा ! मला खुशाल भ्रमिष्ट म्हणा ! पण क्षात्र आणि ब्राह्मवृत्तींचें संमेलन करून विश्वव्यापी धर्माच्या दिव्य प्रकाशांत अखिल मानवजातीला वावरूं द्यावें आणि त्यांचें ऐहिक व पारमार्थिक कल्याण चिंतावें हें माझें ध्येय आहे. त्याप्रीत्यर्थ माझें अंतःकरण तळमळत आहे—रात्रंदिवस जळत आहे. कर्तव्यतत्परतेचा अग्नि लागून पेटलेल्या या अंतःकरणांतील उद्‌गार तुम्हांला कसेहि वाटोत, त्याची मला पर्वा नाहीं.

**परशुरामः**—विश्वामित्रा ! बापाच्या वधाचें चित्र अजून माझ्या दृष्टीसमोर उभें आहे. तेव्हां क्षत्रियांना उन्नत कसा करूं? बा चित्रा ! जा—माझ्या दृष्टीसमोरून जा ! नाहीं ! विश्वामित्रा ! हें भयंकर चित्र माझ्या दृष्टीसमोरून जात नाहीं. हें क्रूर व भयंकर चित्र जोंपर्यंत माझ्या दृष्टीसमोर उभें आहे तोंपर्यंत हा परशुराम क्षत्रियांचा शत्रूच राहणार !

**विश्वामित्रः**—ब्राह्मणांनीं धर्मप्रसारार्थ द्वेषाला व मत्सराला फांटा दिलाच पाहिजे. स्वहित व स्वप्रतिष्ठा हें ब्राह्मणाचें शील नसून जगत्कल्याण—जगदुद्धार—हेंच ब्राह्मणांचें ब्रीद होय. असें असतां, बापाच्या वधाबद्दलचा सूड तूं आणखी किती वेळ सर्व क्षत्रियजातीवर घेणार? आतां शस्त्र खालीं ठेव आणि क्षत्रियांचा व तुझा कलह कायमचा नष्ट कर!

**परशुरामः**—हा कलह कायमचा कसा मिटेल? एक तर हा परशुराम मेला पाहिजे; किंवा माझ्या हयातींत सारे क्षत्रिय तरी नष्ट झाले पाहिजेत. त्याशिवाय हा कलह मिटणें शक्य नाहीं. ज्या कलहाला तपेच्या तपें लोटलीं तो क्षणार्धांत नाहींसा कर म्हटल्यानें कसा नाहींसा होईल?

**रावणः**—आणि आपण शस्त्र खालीं ठेवल्यावर क्षत्रिय पुन्हा उन्मत्त होऊन आपला पुन्हा मानभंग करणार नाहींत कशावरून?

**परशुरामः**—( विश्वामित्रास ) होय. म्हणूनच म्हणतों कीं, तुझा प्रयत्न जगदुद्धाराकरितां नाहीं, तर आम्हांला नष्ट करण्याकरितां आहे.

**विश्वामित्रः**—त्यांतच जर जगदुद्धार असेल, तर मला तसेंच केलें पाहिजे. ज्याला जगदुद्धार करायचा असतो, त्याला आपल्या शुद्ध व पवित्र हेतूच्या साध्यार्थ प्रसंगीं हजारों वीरांना जवळहि करावें लागतें व हजारोंचा बळीहि घ्यावा लागतो. जगदुद्धार व्यष्टिसमूहाच्या हितांत नसतो, तर तो कर्त्याच्या शुद्ध बुद्धींत व उज्वल मनःशक्तींत प्रतिबिंबित झालेला असतो. म्हणून म्हणतों कीं, पुन्हा विचार कर.

**रावणः**—विचार कसला करायचा? तुझ्या गोड वाणीला भुलून शस्त्र खालीं ठेवण्याइतके भार्गवराम दुबळ्या अंतःकरणाचे नाहींत.

**परशुरामः**—मी कोणाच्याहि वाणीला भुलणारा नाहीं. माझा धर्म, माझी नीति किंवा माझें कर्तव्य सर्व कांहीं क्षत्रियांचा संहार करणाऱ्या या परशूंत आहे.

**रावणः**—योग्य उत्तर! आपण शस्त्र खालीं ठेवलें तर मूळचा क्षत्रिय असलेला हा विश्वामित्र आपल्याला स्वतःच्या प्रभावळींत बसवील आणि घाण्याच्या बैलाप्रमाणें इच्छेला येईल तिकडे फिरवील.

**परशुरामः**—याच्या प्रभावळींत जाऊन बसण्याइतका मी वेडा नाहीं.




विश्वामित्रः—या उन्मत्ताच्या प्रभावळींत जाऊन बसण्यापेक्षां— [पृ. ५३

**विश्वामित्रः**—या उन्मत्ताच्या प्रभावळींत जाऊन बसण्यापेक्षां माझ्या प्रभावळींत येऊन बसलास, तरी परशुरामा, तुला कमीपणा नाहीं रे! इतकें कशाला? तूं जर या वेळीं शस्त्र खालीं ठेवशील, आणि क्षत्रियांना हाताशीं धरून वर्णाश्रमधर्माची बिघडलेली घडी सुव्यवस्थित करूं लागशील, तर मी असाच्या असा तपश्चर्येला जाऊन बसतो, आणि ती सर्व दैवी पुण्याई सत्कार्य करण्याकरितां तुला अर्पण करतों. पण तुझ्यासारख्यानें आत्मप्रौढीला व आत्मप्रतिष्ठेला इतक्या बेमालूम रीतीनें बळी पडण्याचा हा काळ नव्हे रे! संन्याशी अगर ब्राह्मण हा जनतेचा पिता होय. म्हणून म्हणतो कीं, स्वकर्तव्याला थोडें तरी जाग!

**परशुरामः**—कर्तव्य? कसलें कर्तव्य सांगतोस? कर्तव्यभ्रष्ट कर्तव्यभ्रष्ट असें म्हणून जिथें तिथें तूं मला कमीपणा आणूं पहातोस.

**विश्वामित्रः**—कर्तव्यभ्रष्ट म्हणून या सर्व परिस्थितीचें खापर तुझ्या डोक्यावर फोडूं नको, तर कोणाच्या फोडूं? तुझ्या कर्तव्यविन्मुखतेमुळेंच या दुष्टानें धर्माचा छळ आरंभिला आहे.

**परशुरामः**—हा धर्माचा छळ नव्हे; तर तुझा छळ आहे, व तो यापेक्षां अधिक कडक व्हावा अशी माझी इच्छा आहे.

**विश्वामित्रः**—परिस्थितीचा दास झालेल्यानें असें बोलूं नये तर कोणी बोलावें?

**रावणः**—ब्राह्मणश्रेष्ठ! आपल्याविरुद्ध तसेंच माझ्याहिविरुद्ध यानें पुन्हा कधीं चकारशब्द काढूं नये म्हणून याचा या वेळीं कडेलोट करणेंच मला योग्य वाटतें.

**परशुरामः**—पाहूं दे! माझ्या शत्रूचें मरण मला पाहूं दे!

**रावणः**—चला! न्या याला त्या उंच कड्यावर आणि तेथून याचा कडेलोट करा!

**ऋषिमंडळः**—नारायण! नारायण!

**विश्वामित्रः**—हे महात्म्यानों, सत्य हें त्रिकालाबाधित असतें, असें दीनांचा वाली जो दयाघन परमेश्वर तो आपल्या दिव्य वाणीनें सांगत आहे. परशुरामा, पहा! माझा मृत्यु आनंदानें पहा! पण यामुळेंच

माझ्या मरणाला आनंदानें सहानुभूति दाखविणारा परशुराम निस्तेज होत आहे, हें कुठें तुझ्या लक्षांत येतें ? या दीन झालेल्या ऋषींचा 'नारायण नारायण' हा आर्त स्वर ऐकून ज्याअर्थी तुझ्या अंतःकरणाला दयेचा पाझर फुटला नाहीं, त्याअर्थी यांचा शाप तुला बाधल्यावांचून राहणार नाहीं. या कपटपटु रावणाच्या दिखाऊ सत्काराला तूं भुललास, भूल ! जा नरकांत ! तुझ्यासारखे ब्राह्मण कर्मभ्रष्ट होऊन जेव्हां परिस्थितीनें जखडले जातात, तेव्हां देवब्राह्मणांना कुणीहि तुडविलें तर नवल काय !

———

# तृतीय काण्ड

## चित्र पहिलें

### आर्यावर्त—विश्वामित्राचा कडेलोट केलेलें स्थान

( ऋषिमंडळी व रामलक्ष्मण उभे आहेत असा देखावा. )

ऋषिः—रामा ! काल दोनप्रहरीं याच भयंकर कड्यावरून परशुरामाच्या समक्ष त्या दुष्ट रावणानें विश्वामित्र ब्रह्मर्षींचा कडेलोट करायला सांगितलें.

रामचंद्रः—पण त्या परशुरामानें रावणाविरुद्ध चकार शब्द सुद्धां काढला नाहीं म्हणतां ? परशुरामासारखे ज्ञानी पुरुष जेव्हां स्वत्वाची भावना विसरून अहंकाराला बळी पडतात, तेव्हांच विश्वामित्रासारख्या लोकसंग्रह-कारी महात्म्याचा निष्कारण छळ होतो. पण तुम्ही आतां शोक करूं नका. गुरुजींचें शरीर तुमच्या नजरेपुढें नसलें तरी त्यांचा हा आत्मा येथें उभा आहे. कारण—

गीत विसावें ( चाल—भान हरी हा मोही०—)

राम जरी हा दीपसम मानला ॥ ध्रु० ॥
दिव्यास उपमा गुरु-पाद जाणा ॥
दिव्याविणा कां सुमोल तयाला ? ॥ १ ॥
गुरु प्राण माझे, गुरु दिव्य माझें ॥
गुरु मोल माझें "मी" नच 'मी' हा ॥ २ ॥

लक्ष्मणः—दादा, तिकडे दैत्यांचा एक हल्ला आपण निवारण केला, तोंच त्यांनीं इकडे दुसरा हल्ला करून त्यांत विजय संपादन केला.

रामचंद्रः—झालेल्या गोष्टीला उपाय नाहीं; पण एवढ्यानें तूं निराश होऊं नकोस.

लक्ष्मणः—हाय ! हाय ! गुरुवर्य, मी आतां आपल्याला कोठें हो

पाहूं ? ऋषींनो, तुमच्यासमक्ष जेव्हां त्या दुरात्म्यानें माझ्या गुरुजींचा कडेलोट केला तेव्हां तुम्हीं आपल्या तपःसामर्थ्यानें त्या दुष्टाला शापून दग्ध कसें केलें नाहीं ?

**ऋषिः**—बाळा ! आमच्या तपःसामर्थ्याचें तेज त्या वेळीं तो भयंकर देखावा पाहून निःसत्त्व झालें होतें.

**रामचंद्रः**—लक्ष्मणा, अरे अशा दुष्टांचा विनाशकाल शिव्याशापांत नसतो; तर तो त्यांच्या दुष्कृत्यांतच असतो. दुष्कृत्यांच्या जीवनानें त्या विनाशकालाच्या अंकुराची वाढ होऊन त्याचा प्रचंड वृक्ष झाला कीं त्या वृक्षाच्या पतनाबरोबरच दुष्टाचें पतन होत असतें. नुसत्या शिव्याशापांनीं जर दुष्ट नष्ट झाले असते, तर त्यांच्या छळापासून जगताला असह्य यातना सहन करण्याचे दुर्धर प्रसंग आलेच नसते. आणि त्या प्रसंगांच्या वैचित्र्यावांचून इतिहासाला हृदयंगमत्वहि प्राप्त झालें नसतें !

**ऋषिः**—होय, बाबा ! आम्हीं डोळ्यांतून मुळमुळ अश्रू ढाळण्याशिवाय कांहींच न करितां येण्यासारखे त्या वेळीं दुर्बळ झालों होतों खरे !

**लक्ष्मणः**—मी एकटा जरी त्या वेळीं गुरुमहाराजांजवळ असतों, तरी त्या पापमूर्तीला महाराजांच्या केसालाहि धक्का लावतां आला नसता. निदान कडेलोट करतांना जरी धांवून गेलों असतों तरी त्या घमेंडखोर रावणाला लोळविलें असतें, आणि कड्यावरून उडी घेऊन गुरुमहाराजांचे प्राण वांचविले असते; पण आतां काय ? गुरुजी ! आपणांला कुठें हो पाहूं ?

**रामचंद्रः**—लक्ष्मणा ! सावध हो. असा धीर सोडण्यांत पुरुषार्थ नाहीं. शोक करून अंतःकरणाची दुर्बलता भलत्याच प्रसंगीं प्रगट करणें वीराला उचित नाहीं. गुरुजींनीं जो आपणाला जगत्कल्याणाचा धडा शिकविला आहे, तो गिरविण्याच्या मार्गाला लागणें म्हणजेच गुरुजींचें अस्तित्व कायम राखण्यासारखें आहे. महर्षींनों, आपण आतां हा अश्रुपात बंद करा. दुःखाला आंवरा, आणि आम्हांला धीर येईल अशा उपदेशाच्या दोन गोष्टी सांगा. तुमच्या आर्त स्वरानें लक्ष्मणाचें अंतःकरण अधिकच दुर्बळ होईल, व शोक करण्यापलीकडे त्याच्याकडून कांहींच होणार नाहीं; तेव्हां हे अश्रू बंद करा.

**लक्ष्मण:**—(सावध होत) गुरुजी—माझ्या प्राणा! आपलें दर्शन आतां मला कोठें हो होईल? (उठून) सत्य अमर आहे असें म्हणतात. आणि गुरुजी, आपण तर सत्याचे मूर्तिमंत पुतळे—नव्हे सत्याचे जन्मदाते! तेव्हां आपण या कड्याखालच्या दरींत जीवंत तर नाहीं? होय. माझे गुरुजी जीवंत असले पाहिजेत. या भयंकर दरींतून आपल्याला वर येतां येत नसेल, तर हा लक्ष्मण आपल्याला वर आण्याकरितां खालीं उडी घेऊन येत आहे. (कड्याकडे जाऊं लागतो तोंच राम त्याला अडवतो) जाऊं द्या. माझे गुरुजी जीवंत आहेत त्यांना वर आणूं द्या!

**रामचंद्र:**—लक्ष्मणा, गुरुजी जीवंत आहेत असा विश्वासाचा वन्हि अधिकाधिक भडकूं दे. पण त्यांच्या शरीराबरोबर आपलें शरीर नष्ट करणें एवढेंच तूं आपलें कर्तव्य समजूं नकोस. तर त्यांचें अंगीकृत कार्य हाच त्यांचा प्राण! हा प्राण कुडींत नव्हता—नाशवंत शरीरांत नव्हता; तर तो त्यांच्या स्वीकृत कार्यांतच होता. तेव्हां त्या प्राणाकरतां प्राण द्यायला तयार हो; म्हणजे गुरुजी जीवंत होऊन तुझ्या अंतःकरणांत उभे राहतील. ऋषींनो, तुम्ही घाबरूं नका. धीर सोडूं नका. परशुरामाला निःशस्त्र करणें आणि रावणाचा उन्माद नष्ट करणें हें आजच्या परिस्थितींतील गुरुजींचें कार्य मी करीन. या त्यांच्या कार्याकरितां—याच त्यांच्या खऱ्या प्राणाकारितां मी आपला प्राणहि देईन.

**विश्वामित्र:**—(दरींतून वर येऊन) देशील! माझ्या कार्याकरितां, माझ्या खऱ्या प्राणाकरितां तूं प्राण देशील अशी मला पूर्ण खात्री आहे!

**लक्ष्मण:**—गुरुवर्य! (विश्वामित्राला भेटतो. राम नमस्कार करतो)

**ऋषिमंडळ:**—ब्रह्मर्षि विश्वामित्रांचा जयजयकार असो!

**विश्वामित्र:**—बाळा लक्ष्मणा, महर्षींनो, मी मरणारा नव्हे! माझा त्या दुष्टानें कडेलोट केला खरा; पण सृष्टिदेवतेनें कड्याखालीं माझे प्राण वांचविण्याकरितां—मला उचलून धरण्याकरितां—लताकुंजांच्या रूपानें आपले वरदहस्त पुढें केले होते. मातेच्या वरदहस्ताचा आश्रय मिळाल्यावर कोणाचे प्राण धोक्यांत पडतील! पाषाणांच्या धारांना रज्जूचे पाश घासून तोडले आणि बंधमुक्त झालों. वर येतों तों आपणां सर्वांची भेट झाली!

**ऋषिमंडळः**—अहाहा! भगवंताची अगाध लीला! प्रभूला वांचवावयाचें असल्यावर तो नानाप्रकारें वांचवितो.

**विश्वामित्रः**—असो. रामचंद्रा, या बालरवीच्या नुसत्या स्मित हास्यापुढें हा लांच्छित चंद्रमा कसा या वेळीं अगदीं फिकट पडला. सर्व तारांगनांना सोडचिठी देऊन हा या वेळीं संन्याशी बनला आहे. शीलवंत व सत्त्वस्थ पुरुष आपल्या कर्तबगारीच्या प्रभावानें दुर्जनांना या चंद्राप्रमाणें फिके पाडीत असतात, आणि जगाला आदर्श होऊन राहतात. असाच जगताला तूं आदर्श होशील यांत तिळमात्र संशय नाहीं.

**रामचंद्रः**—पण तें सर्व श्रेय महाराज ! आपणाला आहे. निरपेक्षता, स्वार्थत्याग आणि कर्तव्यनिष्ठा या त्रयीच्या संमेलनाची मूर्ति आपल्यासारखी गुरुमाऊलीच माझ्यासारख्या मूढ शिष्याला ज्ञानबोधाचें शुद्ध व निर्मल दूध पाजून त्यांत नवीन जीवित निर्माण करीत असते!

**विश्वामित्रः**—तुझी ही अहंकारनष्टता आणि निरपेक्षता पाहूनच तूं माझ्या इच्छा पूर्ण करशील असें मला वाटूं लागलें. आज संध्याकाळपर्यंत आपण मिथिलेला जाऊन पोहोंचूं. तेथील उद्यांच्या कार्याची जबाबदारी तुझ्यावर आहे. परशुरामाचें चाप आज वांकविणें म्हणजे क्षात्रतेजाचा प्रकाश पाडणें होय. चुना हा दगड खरा; पण त्यांत ज्याप्रमाणें अग्नीचें वास्तव्य असतें, त्याचप्रमाणें त्या चापांत वीरांच्या संहारक शक्तीचा–क्षत्रियांच्या नष्टतेचा–प्रखर अग्नि लपलेला आहे. तें चाप वांकविलें म्हणजे तो अग्नि निःसत्त्व होईल.

**रामचंद्रः**—आपण आज्ञा केल्यावर हा आपला शिष्य काय करणार नाहीं? स्वैरसंचारी निसर्गाचा प्रचंड व चिरंजीव ओघ आपण म्हणाल तर मी थोपवून धरीन. आपल्या मुखांतून शब्द निघतांच रावणाचा धिप्पाड देह एका बाणानें भूमितलावर लोळवीन! आपण आज्ञा कराल तर परशुरामाची शेंडी धरून त्याला कायमचें निःशस्त्र करीन. महाराज ! ही आत्मप्रौढी नव्हे; तर आपल्या कृपाप्रसादानें या अंतःकरणांत पेटलेल्या आत्मविश्वासाच्या प्रचंड वणव्याची ही ज्वाला होय!

गीत एकविसावें (चाल—नाहीं लांछन०—)

राया, आपण सुकृपाकर मम शिरीं या दिला ।
मम मोहपटा विभंगोनी विश्वास मज दावियला॥ ध्रु० ॥
भडकला अनल तो या हृदयांत भावना ही ।
लोळ तोच रव गणा । लोला विलोलरहिता ।
रामबाळ समर्थ साच जाहला ॥ १ ॥

विश्वामित्रः—शाबास! विश्वासाची प्रचंड शक्ति जेथें अखंड वावरत असते तेथेंच परमात्म्याचें वास्तव्य असतें. आणि जेथें परमात्म्याचें वास्तव्य आहे, तेथें बालमूर्तिहि मोठमोठीं कार्यें करीत असते. ऋषींनो, चला, आतां आपण मिथिलेच्या मार्गाला लागूं. (जातात)

रामचंद्रः—अहाहा! गुरुकृपेची थोरवी काय वर्णावी?

गीत बाविसावें—(चाल—प्रेम गार्नी०—)

देइ माता जनन सुखवी काया सदा ।
हें मन परि विमल सुमन करि कां कदा ? ॥ ध्रु० ॥
अंधा दिसे वाट । पंगुहि चढे घाट ।
सतत बलता अशी वसत गुरुच्या पदा ॥१॥ (जातो.)

---

## चित्र दुसरें

### मिथिला—जानकीचें निद्रामंदिर.

(जानकी झोंपली आहे असा देखावा)

चंद्राननाः—(प्रवेश करून) अग बाई, ही तर अद्याप निजलचि आहे. पहाटेचा पहिला चौघडा होतांच मी उठेन हो असें म्हणाली होती. पण त्याचा विसर पडला वाटतें. आम्हीं सर्वजणी स्नानाची तयारी

करून केव्हांच्या बसलें. आज स्वयंवराचा दिवस आहे, याची इला आठवण राहिलेली दिसत नाहीं. आज सकाळीं किती तरी कामें आहेत. न्हाणें-धुणें झालें म्हणजे भगवतीच्या दर्शनाला जायचें आहे. चांगलें लाल आभाळ झालें. आतां उठवावेंच हिला! ( उठवायला जवळ जाते. )

**जानकीः**—( झोंपेंतच ) इश्श ! हें काय असें !

**चंद्राननाः**—स्वप्नांत ही कुणाशीं बरें बोलते !

**जानकीः**—( झोंपेंतच ) ही कुठली अशी चुंबनाची रीत ?

**चंद्राननाः** -( हंसून ) चुंबन ? इतक्यांतच कुणी इचें चुंबन घेतलें ?

**जानकीः**—( झोंपेंतून उठून स्वगत ) अखेर स्वप्नच ठरलें ना ! स्वप्नांत जर खरेपणा असता तर किती किती चांगलें झालें असतें ? स्वप्नें पडून झोंपेंत जर सुख मिळतें तर मनुष्याला नेहमीं झोंपच कां लागत नाहीं ?

गीत तेविसावें ( चाल-कान्हा न नुके )

**निद्रा विलया कशी ती गेली ।**
**होतें सुख तेथें बाई ॥ ध्रु० ॥**
**प्रणयनिनाद चाले । मधुसम बोले ॥**
**काय जहाले मम राम ॥ १ ॥** ( आरशांत पाहते )

**चंद्राननाः**—( उघड ) काय ग, कुणी तुझें चुंबन घेतलें ?

**जानकीः**—तूं आपली जेथें तेथें आहेसच वेळेवर. अग स्वप्नांत चुंबन घेतल्याचाच भास झाला.

**चंद्राननाः**—पण कुणी चुंबन घेतलें ?

**जानकीः**—चंद्रानने, स्वप्नच तें ! स्वप्नच पण किती गोड ! परंतु मी या वेळीं स्वप्नांत आहें का माझ्या गालाचें चुंबन घेतलें त्या वेळीं स्वप्नांत होतें ? ही जागृति का स्वप्नस्थिति ? कांहींच कळत नाहीं !

**चंद्राननाः**—हें कळायला उशीर कसला ? ( चिमटा घेते )

**जानकीः**—हें काय ग ?

**चंद्राननाः**—म्हणतात चिमटा घेतल्यावर स्वप्नस्थिति नाहींशी होते. आतां झालीस ना जागी ?

**जानकी**:—मग खरा आनंद–खरें सुख–स्वप्नसृष्टींतच असतें म्हणायचें.

**चंद्रानना**:—मी विचारतें त्या प्रश्नाचें उत्तरच नाहीं.

गीत चोविसावें (चाल–धरि वदनीं अंचला)

**अधर तुझा चुंबिला। अंबु जसा कोंवळा।**
**मंजुसा बोलला। पंडितासम तुला।**
**सांग कोण तो मला ॥ ध्रु० ॥**
**कवण वीर निरखिला। जो शयनीं पातला।**
**नित नव सुखदा तुला ॥ १ ॥**

**जानकी**:—सांगू का तुला? स्वप्नांत येऊन माझ्या गालाचें चुंबनच घेतलें!

**चंद्रानना**:—पण कुणी?

**जानकी**:—अयोध्येच्या युवराजानें!

**चंद्रानना**:—अयोध्येच्या युवराजानें? मग हें नांव लाजत अन् हळूच कां सांगतेस? म्हणतातना मनीं वसे तें स्वप्नीं दिसे. सांग पाहूं स्वप्न?

**जानकी**:—मी गाढ झोंपेंत आहें असें पाहून हळूच माझ्या मंचकावर येणें झालें. आणि हलकेंच प्रेमाची करांगुली अशी माझ्या गालाला टोंचली. मी उठून बसलें अन् जरा रागानें म्हटलें, आपण कुणाच्या हुकमानें येथें आलांत? आपणाला येथें कुणी आणिलें? तेव्हां तिकडून मोठ्या विनयानें म्हणणें झालें कीं, तुझ्या शुद्ध प्रेमशक्तीनें मला येथें येण्याचा संदेश दिला आणि तुझ्या अंतरंगींच्या आत्मविश्वासाच्या जासुदानें मला येथें आणून सोडिलें. हें उत्तर ऐकून मी थक्कच झालें. माझ्यानें बोलवेंचना!

**चंद्रानना**:—बोलवेंचना? अग! पोटभर बोलून घ्यायचें होतें. कारण प्रत्यक्ष बोलायला मिळतें कीं नाहीं कुणाला ठाऊक?

**जानकी**:—थट्टाच करायची असली तर मी नाहीं बोलत जा!

**चंद्रानना**:—बरें, नाहीं करीत अं! पुढें काय?

**जानकी**:—'तुला राग आला का?' असें तेच उलट हंसत हंसत म्हणाले. पण बोलायला माझी जीभ धजेचना.

**चंद्रानना:**—धजेचना ? मग त्यांना भारीच नवल वाटलें असेल ?

**जानकी:**—मला वाटलें माझ्या मौनवृत्तीबद्दल त्यांना राग आला असावा. म्हणून मी त्यांचा मुखचंद्र चोरून पाहूं लागलें. तों मला दोन राममूर्ति दिसूं लागल्या. एक हृदयांत आणि एक जवळ बसलेली. हृदयांतील मूर्ति जरा रागावलेली दिसे आणि जवळची शांत दिसे. शेवटीं माझा हात त्यांनीं आपल्या मानेवर घेतला, आणि आपला हात माझ्या मानेवर टाकला. मला आपल्या वामांकावर बसविलें आणि दुसरा हात माझ्या हनुवटीवर ठेवून नेत्रसंमेलन केलें. तो आनंद काय सांगू ? पण गालाचें चुंबन घेतांच मी रागानें उठून दूर झालें तोंच ती आनंददायक स्वप्नसृष्टि लयास गेली. ही जानकी रामचंद्राच्या वामांकावर बसली आहे असें चित्र मला अजूनहि स्पष्ट दिसतें. पण तें स्वप्नसृष्टींतीलच !

**चंद्रानना:**—पहाटेचें स्वप्न कदाचित् खरेंहि होईल. पण चल आतां जगदंबेच्या दर्शनाला जायचें आहेना ?

**जानकी:**—होय. पण पण जिंकायला अयोध्येच्या युवराजालाच बळ दे अशीच मी जगदंबेची प्रार्थना करणार ! आणि हृदय मोकळें करून तिला सांगणार कीं—

गीत पंचविसावें ( चाल—कुशलि बहु नांदतो )

राम मज भासतो प्राण माझा ।
देहिं तो खेळतो जीव माझा ॥ ध्रु० ॥
अबला का प्रबला ही जाणिव
माझी मला लव ही नुरली बघ ।
हृदयीं डोलत, लोचनीं खेळत
राम दिसे मज सर्वथा राम माझा ॥ १ ॥

[ पडदा पडतो. ]

———

## चित्र तिसरें

### मिथिलेंतील रस्ता.

( गवालाक्ष व कर्पूर प्रवेश करितात. )

**गवालाक्षः**—कर्पूर, आपण परवांच येथें मिथिलेंत येऊन पोहोंचलों; तेव्हांपासून पाहतों तों आतांपर्यंत एकहि सुंदर स्त्री येथें दृष्टीस पडली नाहीं, हें काय ?

**कर्पूरः**—महाराज ! सौंदर्य येथें रस्त्यावर वावरत नसतें. येथील सुंदर स्त्रिया देवालयांत अथवा राजवाड्यांतच दिसायच्या. अन्यत्र दिसणें शक्य नाहीं.

**गवालाक्षः**—म्हणजे देवालयें आणि राजवाडे हे स्त्रियांचे कोंडवाडे आहेत वाटतें. सुंदर स्त्रियांनीं नेहमीं राजरस्त्यांतून अगर सार्वजनिक उद्यानांतून विहार करीत असावें. शहाण्यांनीं सौंदर्य कधींहि कोंडून ठेवूं नये. स्त्रियांना —विशेषतः लावण्यसंपन्न स्त्रियांना—कोंडून ठेवणें म्हणजे सौंदर्याची हानि करणें होय. कारागिरानें निर्माण केलेली सुंदर वस्तु तो जसा सर्वांना पाहूं देतो तसेंच स्त्रीसारखें सुंदर रत्न ज्याच्याजवळ असतें, त्यानें तें जगाच्या प्रदर्शनांत खुशाल खुलें ठेवावें. आम्ही स्त्रियांना कधींहि कोंडून ठेवीत नाहीं. कारण, स्त्री म्हणजे प्रेमाचें उगमस्थान. प्रेम हें नेहमीं नदीप्रमाणें प्रवाही असावें. त्याला बंधन घालणें म्हणजे प्रेमाची गति खुंटवणें होय. प्रेमाचा वृक्ष जितका फोंफावेल तितका फोंफावूं द्यावा. आणि त्याच्या सुखछायेंत वाटेल त्या प्रवाशाला आराम घेण्याची मोकळीक असावी. येथें प्रणय अथवा प्रेम कोंडलेलें दिसतें. फार अरसिक लोक आहां बुवा तुम्ही !

( इतक्यांत तीन मुलें प्रवेश करितात. )

**प० मुलगाः**—अरे, हाच लंकेंतील माणूस !

**द्रु० मुलगाः**—अरे हो !

**ति० मुलगाः**—काल बाबा म्हणाले होते कीं, लंकेंतील माणसेंहि स्वयंवराकारितां आलीं आहेत.

**प० मुलगा:**—कसा आहे रे हा वेडाविद्रा !

**दु० मुलगा:**—फारच विचित्र आहे बुवा !

**ति० मुलगा:**—अरे हाच राक्षस. राक्षसांच्या गोष्टी तूं ऐकल्या नाहींस ! अत्यंत पापी व दुराचारी जो माणूस तोच राक्षस. लंका म्हणजे राक्षसांचें आगर. कसें आहे रे हें वेडेविद्रें भूत !

**गवालाक्ष:**—काय रे कर्पूर ! हीं पोरें अशीं माझ्याकडे काय म्हणून पाहतात ?

**कर्पूर:**—पोरेंच हीं ! यांना आपला चेहरा, आपला पोषाक हें सर्वच कांहीं विचित्र वाटतें.

**गवालाक्ष:**—या मुलांना मी आवडतों का रे ? मुलांना मी आवडलों असेन तर सुंदर सुंदर स्त्रियांना आवडलोंच समज. मुलांनो, या इकडे या !

**प० मुलगा:**—चमत्कारिकच माणूस दिसतो.

**दु० मुलगा:**—बोलावतो तर चला जवळ.

**ति० मुलगा:**—होय, अरे ! काय म्हणतो तें तर ऐकूं.

**गवालाक्ष:**—या, जवळ या, भिऊं नका.

**कर्पूर:**—( स्वगत ) पोरांशीं टवाळकी करून ही स्वारी लाथा खाणार !

( मुलें हंसत हंसत जवळ जातात. )

**गवालाक्ष:**—खरें सांगा, मी आवडतो का रे तुम्हांला ? माझ्यावर तुम्हांला प्रेम करावेंसें वाटतें का ? लाजूं नका सांगायला. ही घ्या खाऊसाठीं रौप्यमुद्रा. ( मुद्रा पुढें करितो. )

**प० मुलगा:**—कोणी दिलेलें घेऊं नये असें बाबांचें आम्हांला सांगणें आहे.

**गवालाक्ष:**—घ्या. नाहीं ? मग तुझें माझ्यावर प्रेमच नाहीं म्हणायचें.

**दु० मुलगा:**—प्रेम ? प्रेम म्हणजे काय बुवा ?

**गवालाक्ष:**—कर्पूर, पाहिलींस कशीं अरसिक पोरें आहेत हीं ! यांना प्रेम कसें तें अद्याप ठाऊक नाहीं. तुम्ही काय शिकत असतां ?

**ति० मुलगा:**—वेद, वेदांग, अर्थशास्त्र, न्यायशास्त्र इत्यादि इत्यादि.

**गवालाक्ष:**—अरेरेरे ! कर्पूर, कोंवळ्या पोरांच्या बुद्धीचें मातेरें करणें

आहे रे हें ! अशा वयांत एवढे मोठे ग्रंथ ! अशा कोंवळ्या व नाजुक वयांत प्रेमरसानें ओथंबलेल्या काव्यांचाच यांनीं अभ्यास करावा.

प० मुलगा:—नाहीं नाहीं ! तसल्या काव्यांचा अभ्यास प्रौढ वयांत करावा म्हणजे मनावर वाईट संस्कार होत नाहींत, असें आम्हांला गुरुजींचें सांगणें आहे.

गवालाक्ष:—कुठले जंगली गुरुजी म्हणतात असें ? खोटें--साफ खोटें ! तुम्हांला प्रेम ठाऊक नाहीं ? दुर्भाग्य बाबा ! हें पहा मी तुम्हांला प्रेमाची व्याख्या सांगतों. पण अगोदर असें सांगा कीं, मला पाहून तुम्हांला कसें वाटतें ?

दु० मुलगा:—कसें वाटतें म्हणजे ?

गवालक्ष:—कांहीं प्रेम वाटतें का ?

ति० मुलगा:—पुरुषांना बायकांसंबंधानें प्रेम वाटतें. पण तुम्ही बायको आहां काय ?

प० मुलगा:—अरे, मिशा नाहींत तेव्हां बायकोच असावी !

दु० मुलगा:—पुरुषवेषधारी ताटिका तर नव्हे ? पण तिला रामचंद्रांनीं ठार केलें म्हणतात.

ति० मुलगा:—अरे, अशीं कांहीं बिनमिशांचीं माणसें असतात; त्यांपैकींच हें एक !

गवालाक्ष:—कर्पूर, हीं पोरें फारच फाजील आहेत बुवा. यांना शिस्त म्हणून बिलकुल अवगत नाहीं. चला व्हा दूर. रानटी कुठले !

प० मुलगा:—आम्ही येथें अस्से उभे राहणार.

दु० मुलगा:—होय.

ति० मुलगा:—अस्से उभे राहणार !

प० मुलगा:—या वाटेवर सत्ता गाजविणारे तुम्ही हो कोण टिप्पोजी ?

गवालाक्ष:—आम्ही राजा जनकाचे पाहुणे आहोंत. तेव्हां वाट सोडा. व्हा बाजूला.

प० मुलगा:—आम्ही येथून हालत नाहीं.

गवालाक्ष:—गाढव कुठले !

दु० मुलगा:—( वेंगाडून ) ग्यारव कुठले !

**गवालाक्ष**:—नाहीं बाजूला होत ? ( काठी उगारतो. )

**ति० मुलगा**:—हं ! राक्षसराव, संभाळून असा. नाहीं तर हाल होतील.

**प० मुलगा**:—पाहुणे असाल तर आपली अब्रू आपल्या हातानें राखा.

**गवालाक्ष**:—( काठी मारून ) व्हा बाजूला. ( मुलें काठी घेतात व त्याला खालीं पाडतात. )

**प० मुलगा**:—पडला राक्षस.

**दु० मुलगा**:—रामलक्ष्मणांनीं विश्वामित्र ब्रह्मर्षींच्या यज्ञाला विघ्नें करणारे राक्षस धुळीस मिळविले, तसाच आपणहि हा राक्षस धुळीस मिळवूं.

**ति० मुलगा**:—कसें काय राक्षसराव ?

**प० मुलगा**:—हा फारच नेभळा राक्षस आहे बुवा !

**गवालाक्ष**:—अरे कर्पूर ! कर्पूर ! मला सोडीव रे बाबा !

**कर्पूर**:—नोकरानें धन्याला कसें सोडावें बुवा ! धनी चाकराची मुक्तता करूं शकेल. कारण, चाकर धन्याचा बांधलेला असतो.

**गवालाक्ष**:—अरे, पण तूं प्रामाणिक चाकर आहेसना ?

**कर्पूर**:—मारून मुटकून केलेला नोकर प्रामाणिक नसतों बरें !

**प० मुलगा**:—एक ! ( पोटावर पाय देऊन बाजूला जातो. )

**दु० मुलगा**:—दोन ! ( पहिल्याप्रमाणेंच करितो. )

**गवालाक्ष**:—मेलों ! मेलों ! माझा प्राण घेतां काय ?

**ति० मुलगा**:—नाहीं. आपल्या पोटाची वाढ वाजवीपेक्षां फाजील झाल्यामुळें मेंदूला मिळावें तसें रक्त मिळत नाहीं, म्हणून अक्कल कमी आहे. पण पोटाची वाढ खुंटवून तेंच रक्त मेंदूकडे दिलें म्हणजे अक्कल जरा वाढेल. म्हणून तीन ( पोटावर पाय देतो. )

( कर्पूर मुलांपासून सोडवितो व मुलें जातात. )

**गवालाक्ष**:—सकाळीं उठून सहल करण्याकरितां जावें म्हणून वेशीबाहेरील देवीच्या मंदिराकडे निघालों तों हा प्रकार घडला. कोण उद्धट पोरें हीं ! बाबारे, मला देवीच्या मंदिराकडे घेऊन चल. ( कर्पूर व गवालाक्ष जातात. )

[ पडदा वर जातो. ]

---

## चित्र चवथें

### मिथिला—भगवतींचें मंदीर

( जानकी आपल्या मैत्रिणींसह दर्शनाला आली आहे. )

**सर्वजणी:—**

गीत सख्विसावें ( चाल—मधु मधुर )

बहु सुखद जननी जना।
निर्मियलें गृह अंबर तूं हें।
परी न वससी क्षणभरही कशी ॥ ध्रु० ॥
व्यापुनि विलग असासि ह्या सदा।
वसत जगत त्या ठाया ॥ १ ॥

**जानकी:**—तुम्हीं सर्वजणी फुलें घेऊन या. मी तोंपर्यंत भगवतींचें ध्यान करतें. ( मुली जातात ). आचार्य, स्मरणी द्या पाहूं.

**पुजारी:**—बाईसाहेब ! आपलें ध्यान संपेपर्यंत मीहि इतर देवतांची पूजा आटोपून येतों.

**जानकी:**—या. ( पुजारी जातो. )

**गवालाक्ष:**—( प्रवेश करून ) अहाहा ! फारच सुंदर हें उद्यान. या वर्षाऋतूच्या आरंभकाळीं सृष्टिदेवतेची ही नैसर्गिक अपूर्व शोभा मानवांनीं व्यवस्थित स्वरूप दिल्यामुळें अधिकच मनोहर दिसतें. परंतु रुक्ष ! सारें उद्यान रुक्ष आहे ! एथें एकादेंहि तरुण जोडपें अगर एकादीहि तरुणी विहार करतांना दृष्टीस पडत नाहीं. त्यामुळें ही सारी शोभा रुक्ष वाटते. (जानकीकडे पाहून) अहाहा ! ही तरुणी कोण ? ही राजकन्या जानकी तर नव्हे ? ती देवीच्या मंदिरांत आली आहे म्हणे ! पण ही एकटी कशी ? आणि ही अशी मौन धरून कां बसली ? कां राजकन्या नव्हेच ? कुणीहि कां असेना ? पण लावण्यसंपन्न असून मंदोदरीमहाराणीप्रमाणेंच भाविक

व देवभोळी दिसते. ही जर आपल्याला वश झाली तर सर्वांच्या अगोदर उठून धनुष्याला प्रत्यंचा चढविण्याचा खटाटोप हवा कशाला? राज्य नाहीं मिळणार तर न मिळो. राज्यें मिळवावीं आणि सांभाळावीं रावणमहाराजांनीं. बायका मिळविणें आणि त्यांना सांभाळणें हें राज्य मिळविण्याइतकें व सांभाळण्याइतकेंच दुस्तर आहे; किंबहुना अधिक दुस्तर आहे असें माझें प्रामाणिक मत आहे. ही कशाकरतां बरें डोळे लावून बसली? देवीला माझ्यासारखा अनुरूप वर तर ही मागत नाहीं? देवी कसा आणि कुठून वर देणार? वरप्राप्तीकरतां वराचीच आराधना केली पाहिजे. (जानकीची आराधना संपते. ती नमस्कार करूं लागते तोंच तिच्याजवळ जाऊन) हे सुंदरी!

**जानकीः**--(भीतीनें उठून) कोण? कोण आहांत आपण?

**गवालाक्षः**—(स्वगत) "कोण? कोण आहां आपण?" केवढी गोड वाणी! अरे, पण ही फार घाबरलेली दिसते. (उघड) सुंदरी!

**जानकीः**—कोण तुम्ही? एथें कशाला आलां?

**गवालाक्षः**—सुंदरी! भावी त्रैलोक्याधिपति अशा लंकाधीशाचा मी दरबारी अश्वपति आहें. तूं जर मला वश झालीस तर जानकीला पणांत जिंकण्याची मी दगदग करणारच नाहीं. मग माझी आराध्यदेवता तूंच! अशी घाबरतेस कां?

**जानकीः**—अग चंद्रानने! चंद्रानने! कुणीच कशा मेल्या जवळ नाहींत? तुम्ही वाट चुकून इकडे आलां असाल तर जा पाहूं एथून!

**गवालाक्षः**—जाऊं? तुझ्याशिवाय कसा जाऊं? गुरांच्या गळ्यांत ज्याप्रमाणें लोढणें बांधतात त्याप्रमाणें प्रेमबंधनांनीं तूं माझ्या गळ्याला बांधली गेली आहेस! तेव्हां माझ्याबरोबर तुला आलेंच पाहिजे.

**जानकीः**—अग चंद्रानने! जरा दूर व्हा!

**गवालाक्षः**—कुणाला कशाला बोलावतेस? हे लावण्यलतिके! राजकन्या जानकी देखील तुझ्या सौंदर्यापुढें तुच्छ असावी! असलें सौंदर्य, असला नाजूकपणा साऱ्या त्रिभुवनांत कोठें आढळणार नाहीं. आमच्या मंदोदरीमहाराणी देखील हें सौंदर्य पाहून लाजेनें मान खालीं घालतील.

**जानकी**:—अग चंद्रानने! (गवालाक्षास) तुम्हांला सभ्याचार कांहींच ठाऊक नाहींसा दिसतो. का तुम्ही माथेफिरू आहांत? कुमारिकेशीं इतका लघळपणा करतांना तुम्हांला कांहींच कसें वाटत नाहीं?

**गवालाक्ष**:—यांत काय वाटायचें आहे? कुमारिकेशीं कुमाराचें वर्तन असेंच असावें! माझ्या या वर्तनालाच कुमारकुमारिकेचा सभ्याचार म्हणतात. माझ्यासारख्या कुमारानें एकाद्या कुमारिकेच्या सौंदर्याचें वर्णन केलें असतां तिनें मोठ्या प्रेमानें अधिकाधिकच खुललें पाहिजे. आणि दोन गोड शब्द बोलून त्याचा सत्कार करायला सज्ज झालें पाहिजे.

**जानकी**:—आपण मुकाट्यानें जा पाहूं एथून! अग चंद्रानने!

**गवालाक्ष**:—सुंदरी! माझा असा तिरस्कार कां करतेस? तूं माझी अर्धांगी झाल्यावर मी तुला तळहातावरच्या फोडाप्रमाणें वागवीन. तुझ्या मुखांतून शब्द निघण्याचाच अवकाश कीं त्याची अंमलबजावणी झालीच समज! मग माझा तिरस्कार कां करतेस?

**जानकी**:—अग, कुणी तरी या ग लवकर! हा मेला दुष्ट—

**रामचंद्र**:—(पडद्यांत) कोण दुष्ट?

**गवालाक्ष**:—अरे कर्पूर, सोडीव रे बाबा! (पळतो.)

**रामचंद्र**:—(प्रवेश करून) कोणता दुष्ट आला आहे येथें? (जानकी घाबरून रामाच्या खांद्यावर डोकें ठेवतें) भगवतीच्या दर्शनाला निघालों तों याच भगवतीचें दर्शन झालें! मला--या अजिंक्य रामाला—मोह पाडणारी ही कोण बरें असावी?

**चंद्रानना**:—(प्रवेश करून स्वगत) अगबाई! हें काय?

**गीत सत्ताविसावें** (चाल—विहरति या स्थलीं.)

**सागरगंगासंगम कां नव ? ॥ ध्रु० ॥**
**कीं चपलाघनसंयोगदर्शन ।**
**मज कळे न भ्रमांत असें मन ॥ १ ॥**

**जानकी**:—(शुद्धीवर येऊन स्वगत) काय? मी हें काय पहात आहें?

ज्या प्रतिमेचें मी निरंतर ध्यान करीत असें, ती येथेंच मूर्तिमंत कशी अवतरली? (सलज्ज पहात चंद्राननेकडे जाते.)

रामचंद्रः—(स्वगत)

गीत अठ्ठाविसावें (चाल–एजि तुम०)

जणुं चमकत चपला चंचल ही।
नवरी शामल मेघवराची चंचल ही ॥ ध्रु० ॥
स्थिर कशी ही येथें जहाली।
जरि शशि-रामा तारा गणली।
तरि भानू वरुनि कां पाही ? ॥ १ ॥

चंद्राननाः—काय ग! कशाला बोलावित होतीस ?

जानकीः—कशाला बरें!

रामचंद्रः—(स्वगत) छे! ही चपलाहि नव्हे व ताराहि नव्हे!

चंद्राननाः—दोघांच्या एकान्तांत मी कशाला हवी होतें?

जानकीः—पुरे कर चावटपणा! तुला कशाला बरें बोलाविलें मी?

चंद्राननाः—शर्थ केलीस बाई! तेंहि नाहीं का आठवत? पण काय ग! अखेर स्वप्नच खरें ठरलें ना?

रामचंद्रः—(स्वगत) पायांनो, मागें चला. काय? तुम्हीं येथून हालणार नाहीं म्हणतां? हे भूदेवि! तुझ्या ठिकाणीं आकर्षणशक्ति आहे म्हणतात, तिचा मारा माझ्यावरच कां केला? मला आकर्षण करण्याकरतां अवतरलेली ही कोणी भूदेवता तर नव्हे?

गीत एकोणतिसावें (चाल–प्रेम भावें.)

भूमिबाला हीच कां नव ललना ?।
रवि शशि धरी नयना ॥ ध्रु० ॥
डुलतो नागेंद्र हा कचसंघ काळा
शिरिगिरिवरि या ना ? ॥ १ ॥

गालीं गोंदण नवें, जैशी वासंती
सजली जाणा ॥ २ ॥

चंद्रानना:—आठवतें कां कशाला बोलाविलें तें ?

जानकी:—नाहीं ग !

चंद्रानना:—कसें आठवेल ? चित्त कुठें आहे ठिकाणावर !

रामचंद्र:—(स्वगत) बा प्रणया ! ही सुंदरी माझ्या अंत:करणांत तुझा प्रवेश व्हावा म्हणून जरी तुला मार्ग दाखवित असली तरी मी तुला माझ्या अंत:करणांत थारा देणार नाहीं. (उघड) मी येण्यापूर्वीं येथें कोणी दुष्ट मनुष्य आला होता काय ?

जानकी:—येथें कोणी होतें ? येथें तर कोणीच नव्हतें.

रामचंद्र:—काय कुणीच नव्हतें ? (स्वगत) मग मला भ्रम तर नाहीं झाला ?

चंद्रानना:—चलायचें ना आतां ?

जानकी:—होय.

चंद्रानना:—मग कर तर देवीला नमस्कार.

जानकी:—(नमस्कार करून)

गीत तिसावें (चाल—धांव प्रभूजी धांव०)

भाव धरूनी पायीं तव नम्र माते ! ।
अबला बला देशि तूं, पाव माते ॥ ध्रु० ॥
रामास लाधो बल तव दयाळे ! ।
जिंको तो पणातें वर योग्य मातें ॥ १ ॥

रामचंद्र:—(स्वगत) यावरून हीच जनककन्या जानकी असावी. (उघड) हे देवि ! तुझी इच्छा असल्यावर मी कसा पण जिंकणार नाहीं ? कारण—

गीत एकतिसावें (चाल—तुझी अन्यथा०)

वसे अंबिका ही सदा ह्या हृदीं ।
नसे भेद कांहीं हिच्या या पदीं ॥ ध्रु० ॥

अशा साम्यतेच्या नदीची गती।
पणाचा नगही कां कधीं कुंठवी ॥ १ ॥

जानकीः—हा घ्यावा जगदंबेचा प्रसाद. (रामाच्या हातावर हार टाकते)
पडदा पडतो.

---

## चित्र पांचवें

---

जंगल—रस्ता

( गवालाक्ष प्रवेश करतो. )

**गवालाक्षः**—मला वाटलें होतें कीं भरलीं माझीं शंभर वर्षे! पण पळालों म्हणून बरें झालें. एकूण माझ्या या स्थूल देहाचें रक्षण करायला माझे हे बारीक पाय बरेच कारणीभूत झाले म्हणायचे! दशरथाच्या त्या ज्येष्ठ पुत्राला तेथें येतांना पाहतांच माझी तर पांचावर धारण बसली. काल त्याला पाहून ठेवलें म्हणून ओळखतां तरी आलें; नाहींतर मारीच, त्राटिका, इत्यादिकांप्रमाणें माझाहि निकाल लागला असता; किंवा चंडांशाप्रमाणें कायमचा विद्रूप तरी होऊन बसलों असतों. पोर वयानें कोंवळे खरें! पण बेट्याचा चेहरा किती उग्र! अहाहा! काय थंड गार वारा सुटला! एथें बसून थोडी विश्रांति घ्यावचि (खालीं बसतो). आतां कुठें काळीज धडधडायाचें बंद झालें!

**कर्पूरः**—( प्रवेश करून ) अहो पळा!

**गवालाक्षः**—( भित भित ) पायां पडतों, कान कापा, पण नाक नका कापूं!

**कर्पूरः**—अहो धनीसाहेब, बसलां काय येथें? पळा!

**गवालाक्षः**— कोण कपूर? अरे, ये बैस! मला वाटलें कीं दशरथाचेंच कारटें आलें! मी भ्यायलों नव्हतों तसा!

**कर्पूरः**—अहो! ही बसण्याची वेळ नव्हे; जीव घेऊन पळा लवकर.

**गवालाक्षः**—कर्पूर, तूं काय मला भित्रा समजतोस? अरे! मी जर

भित्रा असतों तर पण जिंकण्याकारितां म्हणून एथपर्यंत कंबर बांधून आलाचें नसतों; समजलास ! मी भिम्रा नाहीं.

**कर्पूरः**—तसे शब्दशूर अहां म्हणा.

**गवालाक्षः**—शब्दशूर तरी आहेना पण मी ? बस्स झालें ! अरे शब्दशूर होणें देखील सोपें नाहीं; अंगांत शौर्य असतें तेव्हांच शूरत्व प्रगट करणारे शब्द मुखावाटे बाहेर पडत असतात. बरें ये बैस. काय रे ! मला देवीच्या मंदिरांत सोडून तूं आतांपर्यंत कोठें रे गडप झाला होतास ? येथें आल्यापासून तूं फारच अप्रामाणिक झाल्यासारखा दिसतोस.

**कर्पूरः**—मी अप्रामाणिक नाहीं. तसा जर असतों, तर आतांपर्यंत तुमची चंडाशाप्रमाणें किंवा मारीच, त्राटिका, इत्यादिकांप्रमाणें केव्हांच गती करविली असती. पण "ज्याचें खावें त्याचें क्षणभर तरी गावें" अशा सांप्रदायापैकीं मी आहें, म्हणून तुमचा जीव वांचविण्याकरितां येथपर्यंत पळत आलों. अहो, माझें ऐका ! तुम्ही येथून पळून एकाद्या ढोलींत लपून बसा.

**गवालाक्षः**—कर्पूर, तूं कुणाला रे भीति घालतोस ? मला ? या सुप्रसिद्ध अश्वपतीला ?

**कर्पूरः**—अहो, देवीच्या मंदिरांत तुम्ही राजकन्येला अडथळा करून पळाला हें लक्ष्मणानें लांबून पाहिलें ! व तो तुमच्या उलट दिशेनें तुमचा शोध करीत निघाला आहे. म्हणून म्हणतो कीं, लपून बसा लवकर !

**गवालाक्षः**—काय ती राजकन्या होती ? आणि मला लक्ष्मणानें पाहिलें म्हणतोस ? काय म्हणालास ?

**कर्पूरः**—होय. त्यानें तुम्हांला पाहिलें आणि तो याच जंगलांत तुमचा शोध करीत आहे.

**गवालाक्षः**—शोध करीत आहे ? अरे बापरे ! आतां कुठें लपूं ?

**कर्पूरः**—अहो, इतक्यांतच कुठें तरी पटदिशी लपा झालें !

**गवालाक्षः**—लपतों बाबा !

**कर्पूरः**—हं ! जा ! लपा लौकर ! ( जातो. )

**गवालाक्षः**—अरे कर्पूर ! कर्पूर ! गेलाच हा ! आतां लपलेंच पाहिजे. ( पुढें जातो तोंच लक्ष्मण अडवितो. )

लक्ष्मणः—थांब, कुठें चाललास ?

गवालाक्षः—मी–मी–मी–मी नाहीं !

लक्ष्मणः—मी–मी–मी–काय चोरा ? तूंच राजकन्येशीं लघळपणा करीत होतास नाहीं ?

गवालाक्षः—मी–मी–मी–मी हो ! मी–मी–मी–मी नाहीं.

लक्ष्मणः—लबाडा, पुन्हा खोटें बोलतोस ? कृति करून अपराध केलास हें एक पाप; आणि खोटें बोलून दुसरें पाप पदरांत घेतोस काय ?

गवालाक्षः—खो–खोटें कशाला बोलूं ? मी पायां पडतों.

लक्ष्मणः—पायां पडलास, तरी तुझ्यासारख्या दुष्टाला मी क्षमा करणार नाहीं. बोल ! राजकन्येशीं तूं काय बोलत होतास ?

गवालाक्षः—कांहीं नाहीं रे बाबा!

लक्ष्मणः—पुन्हा खोटें बोलतोस ?

गवालाक्षः—तिला बरें वाटावें म्हणून तिच्या सौंदर्याचें वर्णन करून मी माझ्या जिभेला व्यर्थ शीण मात्र दिला; परंतु कोणतीहि तरुणी भेटली असतां जिभेला असा शीण देणें, हा मी एक प्रकारचा शिष्टसांप्रदायच समजतों.

लक्ष्मणः—कुठें आहेरे असला आचरटपणाचा संप्रदाय ?

गवालाक्षः—कुठें आहे म्हणजे ? आमच्या लंकेंत ! हो हो ! हें पहा लक्ष्मणा ! झालें गेलें पार पडलें. गतगोष्टी विसरून जाऊं; आणि आपण आतां दोस्त होऊं. तूं आमच्याबरोबर लंकेंत चल, माझा पाहुणा म्हणून मी तुला नेतों. मग तेथील मौज तर पहा !

लक्ष्मणः—पुरें कर हें पुराण ? तूं आमच्या देशांत आहेस; तेव्हां तुला इकडच्या शिष्टाचाराप्रमाणेंच वागलें पाहिजे. परंतु तूं राजकन्येच्या सौंदर्याचें वर्णन कशाला केलेंस ? ती तुझ्यासारख्या मर्कटाला वरील असें तुला वाटलें तरी कसें ?

गवालाक्षः—कां बरें वाटूं नये ? हें पहा लक्ष्मणा ! तूं अद्याप लहान पोर आहेस; तुला मिसरूं फुटायला अद्याप बराच अवधि आहे. तेव्हां तुला यांतील रहस्य समजणें शक्य नाहीं. जरा शांत हो; उगीच संतापूं नकोस !

**लक्ष्मणः**—तुला देखील मिशा नाहींत, तेव्हां तुलाहि पोरच समजलं पाहिजे.

**गवालाक्षः**—होय! मला मिशा असत्या तर पोरें झालीं असतीं. अद्याप एक देखील पोर झालें नाहीं. आणि पोरें झाल्यावांचून पोरपण जाऊन मनुष्याला थोरपण येत नाहीं. तेव्हां तूंहि पोर आणि मीहि पोर; मग आपल्याला दोस्त व्हायला कोणती हरकत?

**लक्ष्मणः**—दोस्ती? आणि ती तुझ्याशीं? ठीक आहे! चल हो युद्धाला तयार!

**गवालाक्षः**—हें काय बरें लक्ष्मणा!

**लक्ष्मणः**—युद्धाला तयार होतोस कां चंडाशाप्रमाणें करूं?

**गवालाक्षः**—नको, नको! होतो तयार! पण माझ्याजवळ शस्त्र कुठें आहे?

**लक्ष्मणः**—मल्लयुद्धास तयार हो! तुम्हींच आमच्या धर्मकृत्यांना विघ्नें आणतां, आणि तुम्हींच आमच्या गुरुजींचा कडेलोट केला होता नाहीं का? चल हो तयार!

**गवालाक्षः**—मी पायां पडतों बाबा!

**लक्ष्मणः**—पायां कशाला पडतोस? चल असा ये इकडे मैदानांत! मी तुझ्याशीं मल्लयुद्ध करतों (गवालाक्षाला ओढून नेतो).

**रामचंद्रः**—(प्र. करून) अरेरे! हें काय करतोस?

**लक्ष्मणः**—(आंतून) दुष्टाचा प्राण घेतों.

**रामचंद्रः**—पण सध्यांच याला मारायचें नव्हतें. कारण, हे सर्व लोक येथें पाहुणे म्हणून आले आहेत; आणि ही गोष्ट जर रावणाला समजली तर आपण शिष्टाचाराचें उल्लंघन केलें म्हणून तो आपल्या विरुद्ध काहूर माजवील. ही क्षत्रियांची नीति नव्हे; म्हणून सर्व लोक आपल्याच दोष देतील.

**लक्ष्मणः**—(प्र. करून) गुरुजींचा कडेलोट करतांना यांनीं कुठें धर्म आणि न्याय यांचें पालन केलें होतें? शिवाय मी याला एका दरींत दडपून टाकतों; मग रावणाला कसें समजेल? बसेल तपास करीत आपला!

**रामचंद्रः**––जा, दरींत लोटून दे पाहूं अगोदर ( लक्ष्मण जातो. ) देवीच्या मंदिरांत हा दुष्ट राजकन्येची विटंबना करीत होता; पण मला पाहतांच हा तेथून पळाला. राजकन्येचें दर्शन होतांच मला याचा पाठलाग करायचा विसर पडला; आणि तिलाहि आनंदाच्या भरांत स्मृति राहिली नाहीं. शुद्ध प्रेमानें दोन आत्म्यांचें मीलन झाल्यावर जो एक प्रकारचा आनंद होतो, त्या आनंदाच्या भरांत दुःखाचा क्षणभर विसर पडतो म्हणतात, त्याचें हें एक लहानसें प्रत्यंतर आहे. तेव्हां–

गीत एकतिसावें ( चाल–बेरी गाडी माय० )

केला क्षात्रनाश अनिवार<br>
धनु तोचि वांकवी हा ॥ ध्रु० ॥<br>
क्षत्रियधर्म हा उदयाचला नवा,<br>
दिनकर शुभकर येत आज राम दावी पहा ॥ १ ॥

---

## चित्र सहावें

### जनकाचा दरबार

( राजा जनक, जानकी, विश्वामित्र, राम, लक्ष्मण आणि इतर राजे व ऋषि बसले आहेत. )

**राजा जनकः**—राजे, महाराजे, आणि इतर सभ्य गृहस्थ हो! आम्हीं आमच्या जानकीच्या स्वयंवराकरितां जाहीर केलेला पण आपणा सर्वांना विदित झालाच आहे. त्याप्रीत्यर्थ आमच्या विनंतीला मान देऊन आपण सर्वजण येथें आलां, म्हणून आम्ही आपले फार आभारी आहों. क्षत्रियांच्या विवाहाच्या तीन पद्धति आहेत. एक वधूची संमति असल्यास तिचे बाहुबलावर हरण करणें, दुसरी गांधर्वविवाह व तिसरी वधूला पणांत जिंकणें.

यांपैकीं तिसऱ्या पद्धतीचा अंगीकार करून आम्हीं हा पण जाहीर केला आहे. ब्राह्मणश्रेष्ठ भार्गवराम यांचें प्रचंड शिवधनुष्य सभास्थानीं ठेविलें आहे. याला जो वीर प्रत्यंचा चढवील त्यालाच आमची जानकी स्वयंवराची माळ अर्पण करील. आणि त्याच वीराला आम्ही आपलें राज्य जांवई म्हणून आंदणादाखल अर्पण करूं.

**रावणः**—( परिवारासह प्रवेश करून ) मिथिला आणि अयोध्या येथील वीरहो, उठा अगोदर, आणि छाती असेल; तर या धनुष्याला स्पर्श करा.

**राजा जनकः**—लंकाधीश, जरा शांत होऊन आसनस्थ तर व्हा !

**रावणः**—छे ! ही बसण्याची वेळ नव्हे. मी येथें बसण्याकरितां आलों नाहीं; तर अयोध्या व मिथिला येथील घमेंडखोर वीरांच्या नजरेला मी माझा पराक्रम आणून देण्याकरितां आलों आहें. वीरहो ! मी पुन्हा आव्हान करितों कीं, छाती असेल तर पुढें या आणि या धनुष्याला नुसता स्पर्श तरी करा !

**एक आर्य राजाः**—राजराजेश्वर, येथें जमलेल्या सर्व क्षत्रियांची आपणांला अशी विनंति आहे कीं, धनुष्याला प्रत्यंचा चढविण्याकरितां फक्त अयोध्या आणि मिथिला या राज्यांतील वीरांनींच उठावें, इतरांनीं उठूं नये, असा या वेळीं प्रतिबंध असावा.

**रावणः**—काय ? प्रतिबंध असावा ! असा प्रतिबंध करणें म्हणजे निमंत्रित केलेल्या देशोदेशींच्या पाहुण्यांचा उपमर्द करण्यासारखें आहे. राजे जनक ! असा एककल्लीपणा जर स्वीकारायचा होता तर दानव वीरांना आमंत्रणच करायचें नव्हतें. हा माझाच उपमर्द आहे असें नव्हे; तर माझ्याचप्रमाणें जे इतर पाहुणे आले आहेत त्या सर्वांचा हा उपमर्द आहे. पाहुण्यांना बोलावून त्यांची अशी मानखंडना करणें म्हणजे शिष्टाचाराचें अतिक्रमण करणें होय.

**आर्य राजाः**—राजन् , मीं जी आपणाला विनंति केली आहे, तिचा लंकाधीशांनीं निष्कारण विपर्यास केलेला दिसतो. क्षत्रिय वीरांनींच प्रत्यंचा चढविण्याकरितां उठावें असा निर्बंध केल्यानें दानव वीरांचा कसा

उपमर्द होतो हें समजणें जरा मुष्किलीचें आहे. येथें जें सर्वांना निमंत्रण करून बोलाविलें तें प्रत्यंच्या चढविण्याकरितां नव्हे; तर समारंभ पाहण्याकरितां; तो सुशोभित करण्याकरितां. लग्नाला वऱ्हाड बोलावतात तें नवरदेव होण्याकरितां नव्हे, तर समारंभ पार पाडण्याकरितांच बोलावतात. तेव्हां लंकाधीशांनीं भलताच अर्थ कां करून घेतला हें कांहींच कळत नाहीं.

**रावणः**—परंतु लग्नसमारंभाची गोष्ट निराळी आणि पणाची गोष्ट निराळी. ' पण ' हा विशिष्ट व्यक्तींच्या सन्मानाकरितां जाहीर केलेला नसतो; तर ' पण ' म्हणजे समारंभाला हजर असलेल्या मंडळींच्या बलाबलाचा निर्णय होय. पणाला हजर असलेल्या प्रत्येक व्यक्तीला आपलें बळ अजमावून पहाण्याचा अधिकार आहे. असा अधिकार जर नसला तर तो पणच नव्हे.

**आर्य राजाः**—परंतु पण जिंकणाराला जानकी आणि जनकराज्य यांची प्राप्ति होणारी असल्यामुळें ती दानवांना व्हावी असें आम्हांला कसें वाटेल ? भार्गवरामांनीं क्रुद्ध होऊन एकवीस वेळां क्षत्रियांचा संहार केला म्हणून आम्ही क्षत्रिय आज शरीरानें दुबळे ठरूं; पण मनानें खास नाहीं. अद्याप आम्हां क्षत्रियांत स्वाभिमान जागृत आहे. आमचीं मनें अद्याप जीवंत आहेत, अशा स्थितींत हा पण सर्वत्राकरितां जाहीर करूं नये अशी आमची महाराजांना विनंति आहे.

**विश्वामित्रः**—आर्य वीरहो ! तुमचीं मनें ज्या अर्थीं जीवंत आहेत, त्या अर्थीं प्रभूची प्रचंड व दिव्य शक्ति तुमच्या साह्याला उभी आहे असा विश्वास असूं द्या. वीरांचीं मनें जेव्हां प्रफुल्लित होतात, त्यांच्या मनःशक्तीचा ओघ जेव्हां सत्कार्याच्या दिशेला वाहूं लागतो, तेव्हां त्या भगवंताला आपल्या सिंहासनावरून उठून वीरांच्या कल्याणाकरितां धांवून यावें लागतें. वीरांची उज्वल मनःशक्ति म्हणजे प्रभूला आकर्षण करणारी देवता होय. तेव्हां वीरहो ! पेटूं द्या, तुमच्या अंतःकरणांतील स्वाभिमानाची ज्योत अशीच पेटूं द्या. म्हणजे तो सर्वसाक्षी दीनवत्सल आपली अद्भुत शक्ति एखाद्या बाळाला देईल आणि तुमच्या आकांक्षा पूर्ण करील.

**रावणः**—राजन् , आपण स्वाभिमानाच्या क्षुद्र जाळ्यांत सांपडून

आपल्या निरहंकारी अंतःकरणाला काळिमा फांसू नका. सर्वो भूतीं समता ठेवणारे म्हणून आपली ख्याति आहे. तेव्हां आपण जाहीर केलेला पणहि समतेचा दर्शक असाच असावा.

**आर्य राजा**:—नाहीं. राजन्, आपण राज्यकर्ते असल्यामुळें स्वाभिमान आपल्यांत किंचित् तरी जागृत पाहिजेच.

**राजा जनक**:—लंकाधीश, आपण कृपा करून आसनस्थ व्हा. वीर हो, असे उतावीळ होऊं नका. मी सर्वो भूतीं प्रेम करणारा आहें. मला सर्व ईश्वरमय भासतें व दिसतें. सुष्टांच्या आणि दुष्टांच्या सर्वांच्या रूपानें भगवंत नटलेला आहे. तेव्हां या प्रसंगीं मी माझी दृष्टि आकुंचित कशी ठेवूं? पण जिंकायला सर्वांना सारखीच मोकळीक आहे. मानव किंवा दानव असा येथें भेद मुळींच नाहीं; म्हणून याबद्दल कुणालाच शंका घेण्याचें कांहीं कारण नाहीं. वीर हो! तुमच्यांत स्वत्व जागृत असेल तर त्याचा प्रकाश अशा व्यापक प्रसंगींहि पडेल. आणि तसा प्रकाश पडला तरच तुम्ही स्वधर्माचा व त्याबरोबरच सर्व जगाचा उद्धार करायला लायक ठराल. क्षत्रियहो! नुसता स्वाभिमान हेंच तुमचें ब्रीद नव्हे, तर स्वाभिमानापासून तों विश्वाभिमानापर्यंत तुमच्या अभिमानाची व्याप्ति आहे हें विसरूं नका! तुमचा स्वाभिमान स्वतःचा उद्धार करण्याकरितां नाहीं; तर सर्व जगाचा उद्धार करण्याकरितां आहे. तुम्हीं आपल्या सामर्थ्याचें तेज अशा सार्वत्रिक प्रसंगींच प्रगट करावें म्हणून आम्हीं हा पण सर्वत्राकरितांच जाहीर केला आहे.

**विश्वामित्र**:—वीरहो! वैराग्यशालि जनकाचें भाषण ऐकून आपण निराश होऊं नका? या पणांतून तुमच्या सत्त्वाची ज्योत प्रकाशमान होणार आहे असा विश्वास असूं द्या! या पणांत मानव वीरालाच जय मिळो अशी भावना असूं द्या! तुमची भावना जसजशी प्रज्वलित होईल तसतसा काळ तुम्हांला अनुकूल होईल. परंतु अंतःकरणाला स्वाभिमानाचा आणि शुद्ध भावनेचा चटका लागूं द्या! राजा जनकासारख्या वैराग्यशाली महं-ताची विश्वव्यापी तपश्चर्याच अदृश्य रूपानें तुमच्या अंतःकरणांत स्वाभि-मानाची ज्योत पेटवीत असते. या दृष्टीनेंच आपली भावना प्रदीप्त करा. आकुंचित दृष्टीचें आवरण काढून टाका आणि सर्वांच्या अंतःकरणांतून

कार्यतत्परतेचा असा एकच सूर निघूं द्या.

**राज ाजनकः**—आतां ज्याला प्रत्यंचा चढवावयाची असेल त्यांनीं खुशाल उठावें.

( राजे लोक आपआपसांत कुजबुजतात. )

**रावणः**—वीरहो! असे कुजबुजतां काय? उठा आणि चढवा प्रत्यंचा.

**लक्ष्मणः**—लंकाधीश! दुसऱ्याला कशाला हिणावतां? आपणच उठा. पण सार्वत्रिक असावा, असें आपण मोठ्या डौलानें म्हणालां होतां ना!

**रावणः**—होय, मी उठायला तयार आहें; पण, आतांपर्यंत मानव वीरांना उत्तेजक अशीं मोठमोठीं भाषणें झालीं. तेव्हां, अगोदर त्यांपैकींच कुणाला उठूं द्यावें म्हणून स्वस्थ बसलों. अगोदर मी उठलों असतों तर पुन्हा तुम्हीं ओरड केली असती.

**एक आर्य राजाः**—आमच्यापैकीं कुणी उठला असता तर आपणहि कदाचित् ओरड केली असती; सामर्थ्य असेल तर उठा, आमची ना नाहीं.

**रावणः**—होय, माझ्यांत सामर्थ्य आहे. पण तुमच्यापैकीं कुणीच कसें पुढें सरसावत नाहींत हें मोठें आश्चर्य आहे!

**रामचंद्रः**—भाषणाचा अतिरेक करून नसता वाद घालण्यांत अर्थ नाहीं. छाती असेल तर व्हा पुढें.

**रावणः**—ठीक आहे! तुमच्यापैकीं कुणीच उठत नाहीं अगोदर? ( कुणीच बोलत नाहींत ) मी प्रत्यंचा चढविल्यावर आपली हरकत तर राहणार नाहीं?

**सभासदः**—नाहीं.

**रावण**—राजन्, घेतों तर आपली आज्ञा.

**राजा जनकः**—उठा आपण, आमच्याकडून कोणताहि प्रत्यवाय नाहीं.

**रावणः**—तर मग हा उठतोंच! ( उठतो ) राजे, महाराजे आणि सर्व सभासद हो, निरपेक्षतेनें अवलोकन करा. हा लंकाधीश–चौदा चौकड्यांचा राणा रावण–परशुरामाच्या अतिप्रबल अशा शिवचापाला प्रत्यंचा लावीत आहे. हे चापा, परशुरामाशिवाय इतरांच्या हातांत तूं गेला नाहींस. तूं हजारों बलवान क्षत्रियांना धारातीर्थीं लोळविलें आहेस, म्हणून तुला

स्वसामर्थ्याची घमेंड असेल; पण, हा लंकाधीश आज तुझी घमेंड नाहींशी करणार आहे. गर्वाच्या ताठ्यानें फुगून तूं ताठ झाला आहेस खरा; पण तुला वक्र करून तुझा ताठा मी जिरवितों. [ धनुष्याजवळ जाऊन क्षणभर त्याचेकडे पहात उभा राहतो. ( स्वगत ) सहस्रार्जुनासारखे महान् पराक्रमी वीर ज्यानें धारातीर्थी लोळवलें, तें हें धनुष्य मला तर वांकविणार नाहीं ? पण छें ! मनाला असें कचरूं देतां कामा नये.]

**जानकी**:—( स्वगत ) माते जगदंबे ! तूं आपली शक्ति धनुष्यावर घाल आणि तें या नरपशूला जाग्यावरून न हालेल असें कर !

**रावण**:—चला ! धनुष्यराज, आतां व्हा तयार. ( धनुष्य एका हातानें उचलण्याचा प्रयत्न करतो; पण तें उचलत नाहीं असें पाहून सभासद हांसतात. ) सभासदहो ! हांसतां काय ? अजून मीं माझ्या प्रचंड शक्तीचा प्रभाव याला दाखविला नाहीं. ज्यानें इंद्राच्या दरबारांतील नवपंडित पालथे घातले, आणि सर्व पंचमहाभूतांना आपलें दास्य स्वीकारायला भाग पाडलें, त्याला हें धनुष्य उचलतां येणार नाहीं अशी का तुमची समजूत आहे ? पहा ! पहा ! आतां मी हें धनुष्य उचलतों आणि माझ्या द्वेष्ट्यांच्या चेहऱ्यावर चमकूं लागलेली हास्यज्योत मालवून टाकतों. ( दोन्ही हातांनीं बळ करून उचलून उभें करतो. )

**जानकी**:—( स्वगत ) जगन्माते ! माझ्यावर दया कर आणि या अधमाचा—या दुष्टाचा—येथेंच गर्वभंग कर.

**रावण**:—( धनुष्य उचलून ) पहा ! पहा ! माझा पराक्रम पहा ! मीं हें धनुष्य उचलून उभें केलें आहे, आतां याला वांकविणें अशक्य नाहीं. मला हांसत होतां काय ? हांसा ! खुशाल हांसा ! नाहींतर याला मीं वांकविल्यावर रडत बसाल. या धनुष्याला वांकवून याचीं हाडें मी जशीं नरम करणार आहें, तशींच याबरोबरच मला हांसणाऱ्या द्वेष्ट्यांचींहि हाडें मी नरम करणार आहें. वीरहो ! पहा ! डोळे फाडून माझा पराक्रम पहा आणि लज्जेनें माना खालीं घाला. राजन्, जानकीला माळ घेऊन उभी राहायला सांगा. धनुष्य वांकवितांच माझ्या गळ्यांत माळ पडली पाहिजे. ( धनुष्य घेऊन पडतो व सभासद हांसतात. )

**राजा जनक:**—वीरहो, हंशा बंद करा! शिवचाप वांकविणें हें कांहीं लहानसहान काम आहे असें नाहीं; लंकाधीशच त्याला जाग्यावरून हालवूं शकेल! आतां तुमच्यापैकीं कुणी तरी उठून हें धनुष्य उचला आणि लंकाधीशाचे प्राण वांचवा.

**रावण:**—बाबानो! कुणी तरी या आणि मला जीवदान द्या! माझा जीव कासावीस होऊं लागला हो! या, आणि हें छातीवरील ओझें दूर करा!

**राजा जनक:**—वीरहो! कुणी तरी लवकर पुढें व्हा, आणि लंकाधीशाला प्राणदान देऊन आपल्या क्षात्रतेजाच्या प्रभावानें जगाचे डोळे दिपवून सोडा. (क्षणभर थांबून) एवढा मोठा वीर धनुष्याचें प्रचंड ओझें छातीवर घेऊन तळमळत असतां त्याला मुक्त करण्याकरितां पुढें सरसावण्याची धमक एकाहि वीरांत नाहीं?

**रावण:**—उचला हो कुणी तरी हें ओझें माझ्या छातीवरून!

**राजा जनक:**—काय? नाहीं! नाहीं! नाहीं! तर मग हा माझा देश निर्वीर्य, नि:पौरुष झाला असें मी समजूं? होय, असेंच समजलें पाहिजे. बाळे जानकी, हो पुढें, आणि या ब्रह्मवृंदापुढें व क्षत्रियांपुढें हा सारा क्षत्रियसमाज आज निर्वीर्य आणि नि:पौरुष झाला म्हणून आपली ब्रह्मचर्यव्रताची प्रतिज्ञा जाहीर कर, व भार्गवरामांनीं सांगितलेल्या प्रायश्चित्तांतून मुक्त होऊन, हें धनुष्य उचलून या लंकाधीशांना प्राणदान दे!

**जानकी:**—काय? बाबा! मी ब्रह्मचर्यव्रताची प्रतिज्ञा जाहीर करूं? आणि मीं जाहीर केलेली प्रतिज्ञा क्षत्रियांनीं आपल्या कानांनीं ऐकावी? वीरहो! मी प्रतिज्ञा जाहीर करतें; पण त्यापूर्वी तुम्हीं सर्व क्षत्रियांनीं आजपासून आम्ही क्षत्रिय म्हणविणार नाहीं, असें जाहीर केलें पाहिजे. सूर्यवंशीय क्षत्रियांसंबंधानें मला विश्वास वाटत होता; पण नाहीं! तुम्हीं सर्व—सूर्यवंशीय क्षत्रियांसह आपली प्रतिज्ञा प्रथम जाहीर करा म्हणजे मी—

**रामचंद्र:**—नाहीं! कोणताहि वीर असो—तो अशी प्रतिज्ञा कधींहि जाहीर करणार नाहीं. क्षत्रिय वीर आज जीवंत आहेत, मेलेले नाहींत. धनुष्याला मी प्रत्यंचा चढवितों व लंकाधीशाला जीवदानहि मी देतों; पण

त्यापूर्वी लंकाधीशाचा ताठा जिरला पाहिजे. मानव वीराशीं नम्रपणानें वागण्याचा कित्ता गिरवायला त्यांनीं आजपासून शिकलें पाहिजे. कृतपापाचें प्रायश्चित्त घेत यांनीं असेंच क्षणभर तळमळत रहावें, म्हणून मी पुढें सरसावलों नाहीं.

**विश्वामित्रः**—शाबास ! रामचंद्रा, शाबास ! पण आतां लंकाधीशाचा ताठा जिरला. बिचाऱ्याच्या तोंडांतून शब्द सुद्धां निघेनासा झाला. असल्या विश्वासघातकी दानव शत्रूवर देखील त्याच्या संकटकालीं उदार बुद्धीनें परोपकार करण्याचें सामर्थ्य फक्त मानवांतच असतें, याचा याला प्रत्यय आणून दे. रामचंद्रा ! याकरितां गुरु, देव आणि पूर्वज, यांचें स्मरण करून दीन होऊन प्राणदानाची याचना करणाऱ्या लंकाधीशाला धनुष्य उचलून जीवदान दे आणि राजा जनकाला चिंतामुक्त कर !

**रामचंद्रः**—हे पुराणपुरुषा ! तुझें अधिष्ठान या वेळीं या बालहृदयांत पूर्ण असूं दे. हे पुण्यवान् पूर्वजांनो ! आपण ब्राह्मण्याचे कैवारी होतां, तेव्हां सर्वव्यापी ब्राह्मणधर्माचा पांग फेडण्याकरितां माझ्याकडे कृपापूर्ण दृष्टीनें पाहून सहाय करा ! गुरुवर्य, आपला चैतन्ययुक्त हस्त माझ्या शिरीं ठेवा ! हे वैराग्यशाली महंत राजे जनक ! आपल्या तात्त्विक कर्माचरणाची पुण्याई आपण मला अर्पण करा ! हे वीरहो आणि महाजनहो ! या बालकाच्या प्रणामाचा स्वीकार करून आपल्या सादिच्छेच्या अधिष्ठानाची शक्ति याला अर्पण करा ! हे नर–नारायण–आत्म्या शिवचापा ! माझ्या नमस्काराचा अंगीकार करून ब्राह्मण्याच्या–विश्वव्यापी धर्माच्या–रक्षणार्थ माझ्या स्वाधीन हो ! आणि स्वजनविध्वंसक म्हणून जो तुझ्या शुद्ध चारित्र्याला कलंक लागला आहे तो धुऊन काढ ! ( चाप उचलतो व रावण उठून उभा राहतो. )

**विश्वामित्रः**—वीरहो, रघुवीर रामचंद्रांत ब्राह्मण्याचे–त्या सर्वव्यापी धर्माचे–रक्षणाकरितां उत्साह निर्माण व्हावा म्हणून त्याचा जयजयकार बोला ! त्या जयजयकारानें परमेश्वर प्रसन्न करा आणि तुमच्या शुद्ध आत्मविश्वासाचें दिव्य तेज माझ्या कर्तबगार रामचंद्राला अर्पण करा. करितां बोला ! रामचंद्राचा जयजयकार बोला !

**सभासदः**—जय जय श्रीरामचंद्रमहाराज !

**रावणः**—पक्षपात ! हा धडधडीत पक्षपात आहे ! मींहि इतकें आणि असेंच धनुष्य उचलून उभें केलें होतें. मग माझा जयजयकार कां केला नाहीं ? ( इतक्यांत राम धनुष्य मोडतो व रावण खालीं मान घालून निघून जातो. )

**सभासदः**—हां ! हां ! हें काय केलेस रामा ? आतां परशुरामाचा तुझ्यावर मोठाच कोप होईल !

**विश्वामित्रः**—वीरहो ! घाबरूं नका ! शांत व्हा ! या धनुर्भंगानें जसा गर्विष्ठांचा गर्वभंग झाला, तसाच परशुरामाचाहि तेजोभंग होणार आहे. हें चाप नर-नारायण-शक्तीनें परशुरामाला अर्पण केल्याचें दर्शक खरें; पण हें कर्तव्यपराङ्मुख होऊन उलट नर-नारायणांच्या नाशालाच कारण झालें होतें. त्या अनन्वित पापाची लाज वाटूनच यानें रामहस्तें मुक्ति मिळविली. आजपासून क्षत्रियवीर पुन्हा पूर्ववत् सद्धर्माचे पाठिंबे बनले असें पूर्ण निदर्शनास आलें ! हा बाल-वीर विश्वव्यापी धर्माचें पालन करून त्याचा सर्वत्र प्रसार करील अशीं शुभचिन्हें आज दिसूं लागलीं. करितां या नूतन नर-नारायणीय शक्तीचा जयजयकार करा !

**सभासदः**—जय जय श्रीरामचंद्रमहाराज !

**रामचंद्रः**—तुम्हां सर्वांच्या अंतःकरणांतून माझ्या जयजयकाराचा जो हा स्फूर्तिकारक ध्वनि निघत आहे, तो जयजयकार माझा नसून, त्या विश्व-व्यापी धर्माचा—त्या ब्राह्मण्याचा—हा जयजयकार आहे. तुम्हां सर्वांची सदिच्छा हेंच माझें बल. हा दाशरथी राम म्हणजे तुम्हां सर्वांच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेल्या दैवी स्फूर्तींचा पुतळा होय. ती ईश्वरी स्फूर्ति मला जग-त्कल्याणाचें कार्य करायला साहाय्य करो ! कारण, तिच्याच कृपेनें—

गीत बत्तिसावें ( चाल—ना छेडो गालि देऊंगी )

या लाभे धर्मसेवा ही नव गंगा नोवरी ।
जी पतित जनांतें तारी ॥ ध्रु० ॥
दूर कराया कुजनां मारी ।
नीति तयाच्या लहरी भारी ॥ १ ॥




**विश्वामित्र:**—या नूतन नरनारायणीय शक्तीचा जयजयकार करा. [ पृ ८४

**जानकी**:—-बाबा ! आतां पणाची सांगता झाली ना ?

**राजा जनक**:—नाहीं ! भार्गवरामाशीं युद्ध झाल्यावांचून पणाची पूर्तता होत नाहीं.

**विश्वामित्र**:—आतां परशुराम आला किंवा महापरशुराम आला तरी माझा रामचंद्रच विजयी होणार ! वीरहो ! चला. आतां आपण हे शिवचापाचे तुकडे मोठ्या समारंभानें मिथिलेच्या वेशीवर नेऊन तेथें रामचंद्राकडून बांधवूं आणि वर्णाश्रमधर्माची पुनरपि प्रस्थापना करण्याची याच्याकडून प्रतिज्ञा जाहीर करवूं. बोला ! माझ्या रामाचा पुन्हा जयजयकार बोला !

**सभासद**:—-जय जय श्रीरामचंद्रमहाराज !

---

# चतुर्थकाण्ड

## चित्र पहिलें

### आर्यावर्त ( जंगल–रस्ता )

**रावण:**—( प्रवेश करून ) मानभंग ! भर दरबारांत सर्व राजे महाराजे यांच्यासमोर झालेला माझा मानभंग मी कसा सहन करूं ? पण मी एकटा येथें काय करणार ? मी चौदा चौकड्यांचा राणा खरा–तेहतीस कोटी देवांच्या छातीवर भर दिवसा–सूर्याच्या तेजस्वी प्रकाशांत नाचणारा मी प्रबल वीर खरा ! पण तोंडावरचा जार वाळला नाहीं अशा पोरासमोर आणि विश्वामित्रासारख्या दर्भ व कमंडलू या वैभवसामग्रीवर नांदणाऱ्या संन्याशासमोर मी कःपदार्थ ठरलों अं ! नव्हे ! मी खरा राजाधिराजच नव्हें ! त्रैलोक्यावर सत्ता गाजवून सारें त्रिभुवन ज्याला आपल्या लहरीसरशीं ठोकरेनें उडवितां येत नाहीं तो खरा राजाधिराजच नव्हे ! म्हणूनच " आपला मानभंग न होवो म्हणजे झालें " हे माझ्या लाडक्या मंदोदरीचे उद्गार अखेर खरे ठरले. ( पडद्यांत वाद्यें व श्रीरामाचा जयजयकार ) जयजयकार ! रामाचा श्रीराम म्हणून जयजयकार ! विश्वामित्रा ! कोठपर्यंत तूं हा जयजयकाराचा पुकारा चालविणार आहेस ? परशुरामासारखा क्षत्रियसंहारक व्याघ्र आपल्या गुहेंत निद्रिस्त आहे तोंपर्यंतच ना ? पण त्याला जागा करून लवकरच मी तुझ्यावर पाठविणार आहे ! मग कसा जयजयकार चालवितोस तें समजेल ! ( मागून परशुराम येतो. )

**परशुराम:**—कोण ? लंकाधीश !

**रावण:**—ब्राह्मणश्रेष्ठांना हा लंकाधीश प्रणाम करीत आहे.

**परशुराम:**—तुझा विजय असो. परंतु पणाचा समारंभ सोडून तूं असा येथें कां ?

**रावण**:—-पण ! महाराज, कसला तो पण !

**परशुराम**:—कां ? असे निराशेचे उद्गार कां ? माझ्या अति प्रबल अशा शिवचापाला कोणीच प्रत्यंचा चढवूं शकला नाहीं ? अशक्यच ! ही गोष्टच अशक्य होती ! इतकें सामर्थ्य मानवांत नाहीं, दानवांत नाहीं आणि देवांत तर नाहींच नाहीं. या परशुरामाच्या हातांत शस्त्र असेपर्यंत याच्या धनुष्याकडे नुसत्या वांकड्या नजरेनें सुद्धां पाहणें अशक्य आहे. मग माझ्या धनुष्याला उचलून त्याला प्रत्यंचा लावणें आणि शेवटीं मला जिंकणें तर दूरच राहिलें ! लंकाधीश ! सांग, मी जीवंत असेपर्यंत या भूमंडळावर असा कोणी पराक्रमी वीर कधीं जन्माला येणें शक्य आहे काय ?

**रावण**:—-शक्य आहे असें मी कसें म्हणूं ? पण महाराज ! जें झालें तें मात्र—

**परशुराम**:—म्हणजे ? माझ्या धनुष्याला कोणी प्रत्यंचा लावली काय ? लावली असली तरी ती माझ्या एकाद्या ब्राह्मण बटूनेंच लावली असेल; असेंच ना ?

**रावण**:—-नाहीं ! महाराज, एका कोंवळ्या पोरानें—विश्वामित्रानें क्षात्र-विद्येंत प्रवीण केलेल्या त्या दशरथाच्या ज्येष्ठ पुत्रानें ! महाराज, नुसती प्रत्यंचा चढविली असती तरी बरें झालें असतें; पण प्रत्यंचा चढवितांना तें धनुष्य वांकवून त्याचे तुकडे तुकडे केले !

**परशुराम**:—-काय तुकडे केले ?

**रावण**:—एवढ्यावरच थांबलें असतें तरी बरें झालें असतें; पण याच्या-हि पलीकडचें असें निंद्य कृत्य त्या विश्वामित्रानें—-

**परशुराम**:—-काय विश्वामित्रानें ? विश्वामित्राचा तूं कडेलोट केला होतास ना ?

**रावण**:—-होय ! पण सृष्टिदेवतेनें—त्या निसर्गदेवीनें—त्याला शेवटीं वांच-विलें म्हणून समजलें.

**परशुराम**:—-निसर्ग देखील त्याला अनुकूल झाला अं ? हा मोठाच चमत्कार म्हणायचा ! बरें असूं दे. निसर्ग अनुकूल असूं दे किंवा महानिसर्ग अनुकूल असूं दे; पण त्यानें काय करविलें ?

**रावणः**--महाराज, तें सांगतांना विश्वामित्राच्या दुष्ट कृतीचें चित्र डोळ्यांपुढें उभें राहातें. आंगाचा संताप होतो. आणि असेंच्या असें जाऊन त्याचा सूड घ्यावा असें माझ्यासारख्यास वाटतें. मग आपणांला-ज्यांचा त्या कृतीशीं प्रत्यक्ष संबंध येऊन पोंचतो त्यांना-काय वाटेल त्याची कल्पना देखील करवत नाहीं.

**परशुरामः**--माझी जनतेंत अप्रतिष्ठा व्हावी म्हणून जर त्यानें कांहीं करविलें असेल, तर त्याला महाशक्तीचें जरी सहाय्य असलें-तरी पण बोलून काय फायदा? लवकर सांग काय तें?

**रावणः**—महाराज, आपल्या धनुष्याचे तुकडे त्यानें लाथेनें तुडविले!

**परशुरामः**—लाथेनें तुडविले? माझ्या धनुष्याचे तुकडे लाथेनें तुडविले?

**रावणः**—होय! लाथेनें तुडवून असें जाहीर केलें कीं, हा धनुर्भंग म्हणजे परशुरामाचा तेजोभंग होय. आतां कोणत्याहि क्षत्रियानें त्याला भितां कामा नये.

**परशुरामः**—भितां कामा नये? कोणत्याहि क्षत्रियानें मला भितां कामा नये? पण माझ्या धनुष्याचे तुकडे केले म्हणून हा परशुराम कांहीं मेला नाहीं! माझ्या धनुष्याचा उपमर्द करणाराचीं व करविणाराचीं हाडें नरम करण्याची शक्ति अद्याप माझ्यांत आहे. माझ्या पित्याचा वध करणाऱ्या कार्तवीर्याचा सूड मीं जेव्हां घेतला तेव्हांपासून या प्रचंड शक्तीला पोषक असें रक्त या शरीरांतील प्रत्येक धमनींतून सारखें वाहत आहे. माझ्या पराक्रमाची जर इतक्यांतच या क्षत्रियांना व या विश्वामित्राला विस्मृति पडली असेल, तर ती त्यांची स्मृति पुन्हा जागृत करतों. हा निसर्ग जरी मला प्रतिकूल असला, तरी मी त्याची पर्वा करीत नाहीं. हें नभोमंडळ माझ्यावर छत्र न धरो. ही भूदेवि मला थारा न देवो, या सर्वांना न जुमानतां-( पडद्यांत वाद्यें व जयजयकार. )

**रावणः**—ऐका! महाराज, हा जयजयकार ऐका! धनुष्याचे तुकडे करून आपल्यावर जय संपादन केला या कल्पनेनें क्षत्रियांनीं त्या पोराची ही जंगी मिरवणूक काढली आहे. ही मिरवणूक मिथिलेच्या वेशीवर आलेली दिसते. तेथें विश्वामित्र आपल्या धनुष्याचे तुकडे लटकविणार असून असें जाहीर करणार आहे कीं, परशुरामाच्या हातांत शस्त्र असेंपर्यंत त्याला कोणत्याहि

क्षत्रियानें व कोणत्याहि ब्राह्मणानें ब्राह्मण म्हणून अभिवादन करूं नये.

**परशुरामः**—पण माझ्या हातांत शस्त्र असेपर्यंत मला ब्राह्मण म्हणून संबोधणार नाहीं असा कोण जन्माला आला आहे ? निःक्षत्रिय पृथ्वी करण्याच्या या बाविसाव्या वेळीं ब्राह्मण व क्षात्र या दोन्ही गुणांचे अधिकारी फक्त ब्राह्मणच आहेत, असें मी माझ्या पराक्रमानें प्रस्थापित करतों. आणि याच पवित्र हेतूनें हा परशु घेऊन या सर्व क्षात्रियांचा पुन्हा संहार करतों. ( जाऊं लागतो तोंच हातांतून परशु गळून पडतो. ) अरे रे रे रे ! पण हा अपशकून कां ? निसर्गाबरोबरच सर्व दृश्यादृश्य शुभ देवता देखील माझ्यावर क्रुद्ध झाल्या काय ?

**रावणः**—महाराज, कसलें शुभाशुभ घेऊन बसलां ? सर्व शुभाशुभ आपल्या परशूच्या पराक्रमावर अवलंबून आहे. जय आणि अपजय हा ज्यांच्या तळहाताचा मळ त्यांनीं शुभाशुभाला भीक घालावी काय ? महाराज, आपल्या अपमानाबद्दल मींच सूड घेतला असता–पण मी परका–येथें काय करणार ? निदान ही गोष्ट आपल्याला कळविल्यावांचून तरी जाऊं नये म्हणून परिवार बाजूला ठेवून आपल्या आश्रमाकडे निघालों होतों; तों आपलें येथेंच दर्शन घडलें !

**परशुरामः**—( परशु उचलून ) लंकाधीशा ! या अपशकुनानें मन जरा दुर्बल होऊं पहात आहे रे !

**रावणः**— शकुनापशकुनाचा आपल्यासारख्या पराक्रमी व ज्ञात्या पुरुषावर परिणाम होऊं लागला, तर आमच्यासारख्यानें काय करावें ?

**परशुरामः**—हे परशो ! चल, तूं जर अपशकुनानें दुर्बल झाला असशील तर क्षत्रियांच्या ताज्या रक्ताचें अमृत पाजून तुला सशक्त करतों. आणि हे कमंडलो ! तुझा या रणयज्ञाचे प्रसंगीं काडीमात्र उपयोग नाहीं, म्हणून तुला या वेळीं ठोकरेचाच प्रणाम ठोकतों ! ( कमंडलु फेंकून देतो. )

( पडद्यांत वाद्यें व जयजयकार. )

**रावणः**—ऐका ! महाराज, पुन्हा हा जयजयकार ऐका !

**परशुरामः**—जयजयकार ! कुठें कोणासमोर आणि कोणाचा जयजय-
कार चालविला आहे ? परशुरामाच्या शत्रूचा जयजयकार ? उन्मत्त क्षत्रि-

यांनो, या जमदग्निपुत्राचा कोप म्हणजे प्रलयकाळचा भडकलेला अग्नि होय. या अग्नीचा लोळ असा हा परशुराम तुम्हांला भस्म करण्याकरितां तुमच्यावर चाल करून येत आहें. तुम्हां सर्वांचा फडशा उडवितों. लहान थोर सारे क्षत्रिय चितेच्या भक्ष्यस्थानीं देतों इतकेंच नव्हे, तर आपल्या मातेच्या उदरांत लपून बसलेल्या बालक्षत्रियांनासुद्धां जेथल्या तेथेंच होते कीं नव्हते करतों. आणि तुमच्या रंडा झालेल्या स्त्रियांच्या विलापांनीं आकाशपाताळ एक होईल असें करून त्यांच्या दुःखाश्रूंनीं जिकडे तिकडे जळप्रलय झाला आहे असें मला प्रतिकूल झालेल्या पंचमहाभूतादि निसर्गाच्या नजरेस आणून देतों. अशा रीतीनें निसर्गाचा ताठा जिरवून त्याला आपल्या चरणावर लोटांगण घालायला लावीन, तरच नांवाचा हा मानी परशुराम! (जातो.)

**रावण:**—आतां मात्र खवळला हा कोपिष्ट व फाजील मानी ब्राह्मण! संतापाच्या भरांत हातच्या कमंडलूला लाथ मारतांना आपला आपणच अपमान करतो याची देखील याला शुद्ध राहिली नाहीं. असो. हा आतां विश्वामित्रादि मंडळीचा संहार केल्यावांचून थोडाच राहणार आहे? आपसांतील कलहानेंच कां होईना—पण या सर्वांना नष्ट केल्यावांचून त्रिभुवनाचा अजिंक्य अधिपति म्हणून माझा जयजयकार कसा होईल? या वेळीं अपमानाचा मोबदला बुद्धिबलानें घेतल्याचें श्रेय मलाच मिळणार आहे! (जातो.)

---

## चित्र दुसरें

### मिथिलेची वेस.

(जयजयकार करीत लोक वेशींतून बाहेर पडतात.)

**विश्वामित्र:**—हा सूर्यास्ताचा समय आहे. या वेळीं परशुराम शरयूच्या तीरावर सायंसंध्येकरितां बसला असेल; तेव्हां त्याला तेथें ऐकूं जाईल एवढ्या

मोठ्यानें जयजयकार बोला. जयजयकाराचा ध्वनि ऐकतांच परशुरामाचें आसन डळमळलें पाहिजे. तो जर ध्यानांत निमग्न असेल तर ध्यानांत जयजयकाराचा ध्वनि त्याच्या कानावर जातांच या शिवचापाचे हे तुकडे– हा त्याचा तेजोभंग–त्याला दिसला पाहिजे. खरें पाहिलें असतां हा जयजयकार माझा नव्हे; रामाचाहि नव्हे; तर या जयजयकाराच्या ध्वनीबरोबर विश्वव्यापी धर्माच्या या पतितकाळांत जगद्धारणेचें कार्य करण्याकरितां साऱ्या विश्वाच्या ज्या प्रवर्तक शक्तीनें जन्म घेतला आहे, त्या ईशशक्तीचा हा जयजयकार आहे. विशिष्ट व्यक्तीचा सत्कार म्हणून हा जयजयकार नाहीं; विशिष्ट व्यक्तीचा अहंकार म्हणूनहि हा जयजयकार नाहीं; तर धर्मवीरांच्या आत्मविश्वासाचा हा पुकारा होय. हें आत्मविश्वासाचें प्रकाशित झालेलें दिव्य होय. या जयजयकारानें आपणां धर्मवीरांच्या ज्ञानाची आणि शुद्ध नीतीची ज्योत प्रज्वलित झाली आहे. या ज्योतीच्या शुद्ध प्रभेनें परशुरामासारख्या आणि लंकाधीशासारख्या विश्वव्यापी धर्माच्या शत्रूंचे डोळे दिपले पाहिजेत. म्हणून करा, पुन्हा रामचंद्राचा जयजयकार करा.

**सभासदः**—जय जय श्रीरामचंद्रमहाराज !

**विश्वामित्रः**—रामचंद्रा, बांध हे शिवचापाचे तुकडे या वेशीला; आणि वर्णाश्रमधर्माची प्रस्थापना करण्याची आपली प्रतिज्ञा जाहीर कर.

( राम वेशीला तुकडे बांधितो. )

**रामचंद्रः**—गुरुवर्य, आपले हे पवित्र चरण साक्षीला ठेवून दृश्यादृश्य सर्व मंगल देवतांसमोर आज हा दाशरथी रामचंद्र अशी प्रतिज्ञा करतो कीं, कोणत्याहि संकटांना न जुमानतां या जगतीतलावर वर्णाश्रमधर्माची मी निष्कामबुद्धीनें प्रस्थापना करून उज्वल नीतिपाठाचे धडे माझ्या शुद्ध चारित्र्यानें जगाला शिकवीन.

**विश्वामित्रः**—ऐका ! रावणाच्या बंदिशाळेंतील सर्व देवांनो, माझ्या रामचंद्राची ही नैतिक सामर्थ्याची व लोकसंग्रहाची प्रतिज्ञा ऐका ! हे देवगुरो बृहस्पते, ऐक ! तूं आपल्या शुद्ध व दिव्य कर्णेंद्रियांनीं ही प्रतिज्ञा ऐक आणि देवांना त्यांच्या मुक्ततेचा आनंदानें संदेश दे ! वीरहो ! अशा अधिकाराचा विडा फक्त अभिषिक्त राजांनीं किंवा ब्रह्मनिष्ठ ब्रह्मर्षींनींच उचलावा

असें कोणी म्हणतील तर त्यांना माझें एकच उत्तर आहे कीं, कोणत्याहि राजापेक्षां किंवा ब्रह्मनिष्ठ ब्रह्मर्षीपेक्षां शुद्ध बुद्धि आणि उज्वल कर्तव्यनिष्ठा माझ्या रामचंद्रांत तिळमात्रहि कमी नाहीं. या दोन श्रेष्ठतम दिव्य शक्तींचें जेथें वास्तव्य असतें तेथें निसर्गतःच लोकसंग्रहाचा अधिकार प्राप्त झालेला असतो. म्हणून या अनभिषिक्त बालराजाचा–या बालवीराचा–श्रीरामचंद्राचा त्रिवार जयजयकार करा!

**सभासदः**—( त्रिवार ) जय जय श्रीरामचंद्रमहाराज !

**परशुरामः**—( प्रवेश करून ) बंद करा जयजयकार! जयजयकार बंद करा! कुणाचा तुम्हीं जयजयकार आरंभिला आहे ? परशुरामाच्या शत्रूचा ? बोला पाहूं आतां पुन्हां जयजयकार! जयजयकार म्हणणारासह ही पृथ्वी उलथीपालथी करून टाकतों!

**विश्वामित्रः**—बोला पुन्हा जयजयकार! कोण पृथ्वी उलथीपालथी घालतो, कशी घालतो तें तरी पाहूं या. याकरतां बोलाच पुन्हा रामाचा जयजयकार!

**परशुरामः**—बोला पाहूं जयजयकार!

**विश्वामित्रः**—काय ? कुणीच बोलत नाहीं ? हा भित्र्यांनो ! असें भितां काय ? आणि कोणाला भितां ? या परशुरामाला ? भिण्यासारखें असें या परशुरामांत काय उरलें आहे ? याच्या धनुष्याला जशी कीड लागली होती, तशीच याच्या पराक्रमालाहि कीड लागली आहे. पराक्रम झाला तरी त्याला सत्याचें पौष्टिक खाद्य मिळालेंच पाहिजे. असत्याच्या खाद्यानें पोसला जाणारा पराक्रम किती दिवस जीव धरून राहणार आहे ? सदाचरणाच्या व सद्धर्माच्या पेटलेल्या वणव्यांत हा असला पराक्रम जळून भस्म होतो. ब्राह्मण्य हें क्षात्रबलाच्या उन्मादावर जिवंत नसतें. आणि जेथें उन्माद आहे तेथें ब्राह्मण्य नसतें. म्हणून परशुरामाच्या ब्राह्मण्यालाहि भिण्याचें कारण नाहीं व त्याच्या क्षात्रतेजालाहि भीक घालण्याचें कारण नाहीं.

**परशुरामः**—विश्वामित्रा! कुणासमोर–कुणाची निंदा चालविली आहेस? मूर्तिमंत हा जमदग्निपुत्र तुझ्यापुढें उभा असतां त्याच्यासमोर असा हा उर्मटपणा ? या प्रसंगीं जर तूं माझ्याविरुद्ध एक अक्षर बोललास तर

संन्याशी किंवा ब्रह्मर्षि म्हणून मी तुझ्यावर बिलकुल दया करणार नाहीं.

**विश्वामित्रः**—मी ब्रह्मर्षि म्हणून तूं माझ्यावर केव्हां दया केली होतीस म्हणून आतां करणार? जेथें हजारों क्षत्रियांचें रक्त तुझा कोपानल विझविण्याकरितां ओतलें गेलें तेथें माझ्यासारखा संन्याशी आणखी एक बळी पडत असेल तर खुशाल पडूं दे! जी धर्मवीरांची स्थिति तीच आम्हां संन्याशांची! पण त्यापूर्वी एक वेळ तरी मला माझ्या रामचंद्राचा जयजयकार ऐकलाच पाहिजे. वीरहो, बोला! या परशुरामाच्या परशूला न भितां माझ्या रामचंद्राचा जयजयकार बोला ( कुणीच बोलत नाहींत. )

**लक्ष्मणः**—( एकटाच ) जय जय श्रीरामचंद्रमहाराज !

**परशुरामः**—विश्वामित्रा ! पहा, तुझ्या फाजील उपदेशाचा परिणाम सानी व वडील यांच्यासमोर कसें वागावें हें या पोरांना कळेनासें झालें आहे.

**लक्ष्मणः**—महाराज, आपण ब्राह्मण असून ब्राह्मणांचें कर्तव्य पाळीत नाहीं. तेव्हां आपल्यासारख्या कर्तव्यभ्रष्टांचा आम्हांला नीति सांगण्याचा तरी कसा अधिकार पोहोंचतो?

**परशुरामः**—मर मग ! घे उद्दामपणाचें प्रायश्चित! ( परशुराम परशु मारून लक्ष्मणाला घायाळ करतो. ) माझ्या धनुष्याचे तुकडे करून ज्यानें लाथेनें तुडविलें त्याला आणि माझा मानभंग झाला म्हणून चालविलेल्या या आनंदोत्सवांत जे जे सामील आहेत त्यांना मी असेंच प्रायश्चित्त देणार आहें.

**विश्वामित्रः**—हा ! कोपिष्ठा अविचाऱ्या परशुरामा, हें काय केलेंस? पोरावर—या कोवळ्या पोरावरच अखेर शस्त्र चालविलेंस ना! मानापमानाच्या क्षुद्र कल्पनांना बळी पडून लक्ष्मणाचा घात म्हणजे पर्यायानें आत्मनाशच केलास ना? तुझ्या कोपाला हजारों क्षत्रियवीर बळी पडले, तरी अजून तुझी शांति झाली नाहीं. पण हे कर्मभ्रष्टा ! असें करून तूं अखेर मिळविणार काय? तर स्वतःबरोबर साऱ्या जनतेला नेऊन काळाच्या दाढेंत जाणार हेंच ना?

**परशुरामः**—काळाच्या दाढेंत कोण ज़ाणार याचा निर्णय याच वेळीं—

सूर्यास्ताच्या पूर्वीच क्रमाक्रमानें होणार आहे.

**विश्वामित्रः**—कसला निर्णय लावणार आहेस ? हातांत शस्त्र आहे याची तुला घमेंड आहे हेंच ना ? तर हा पहा मी तुझ्यासमोर उभा आहें. चालीव—चालीव पाहूं तुझें शस्त्र माझ्यावर ?

**जानकीः**—महाराज ! केवढी भयंकर ही जखम ! हें वाहणारें रक्त कितीहि थांबविलें तरी थांबत नाहीं.

**विश्वामित्रः**—परशुरामा, केवढी ही तुझ्या परशूनें भयंकर जखम पाडिली ! ह्या कोंवळ्या पोरावर हात चालवितांना तुझ्या निष्ठुर अंतःकरणाला कोमलता यत्किंचितहि कशी शिवली नाहीं ?

**लक्ष्मणः**—( विव्हळत ) गुरुवर्य ! गुरुवर्य ! माझा शेवटचा प्रणिपात घ्या ! वैराग्यशाली जनक राजे ! हा लक्ष्मण आपल्या चरणीं शेवटचेंच वंदन करीत आहे; तेव्हां याला आशीर्वाद द्या. दादा ! माझ्या प्रिय रामचंद्रा ! तुझ्या चरणाचें मला शेवटचें दर्शन घेऊं दे. माते जानकी ! या लक्ष्मणाला तुझ्या पवित्र चरणांवर लोटांगण घालूं दे. भार्गवराम ! आपण संतापाच्या भरांत जरी माझा वध केला आहे, तरी अंतकाळीं हा प्राण जातां जातां आपण शस्त्र खालीं ठेवून खऱ्या ब्राह्मण्याला जागाल अशी सदिच्छा धरून हा लक्ष्मण आपणालाहि प्रणिपात करीत आहे. येथें असलेल्या सर्व मुनींना, सर्व वीरांना, आणि महाजनांना माझा शेवटचा प्रणिपात आहे. हा लक्ष्मण आतां आपणा सर्वांचा निरोप घेत आहे. द्या ! तुम्हीं सर्व मला प्रेमानें निरोप द्या. हें पहा ! देवदूत विमान घेऊन आले असून भगवान् विष्णूच्या आणि माता लक्ष्मीच्या मांडीवर खेळण्याकरितां मला बोलावीत आहेत. मी आतां येतों; पण माझी शेवटची एकच इच्छा आहे. वीरहो ! एकवेळ रामाचा—ब्राह्मण्याचा—जयजयकार मला ऐकूं द्या !

**विश्वामित्रः**—हाय ! हाय ! शेवटीं एका आघातानेंच लक्ष्मण गतप्राण होणार ना ?

**लक्ष्मणः**—बोला ! एक वेळ रामाचा जयजयकार बोला ! तो ऐकण्याकरितां माझे प्राण घुटमळत आहेत हो !

**विश्वामित्रः**—याला ताबडतोब उचलून राजवाड्यांत न्या.

आणि शक्य तितके औषधोपचार करून याची जखम बरी करण्याचा प्रयत्न करा.

रामचंद्रः—नका ! लक्ष्मणाला उचलून नेऊं नका. आणि त्याला औषधोपचार करून त्याचें आयुष्य अधिक कष्टमय करूं नका. मरूं द्या ! माझ्या बंधूला असा येथेंच मरूं द्या. माझा नव्हे, तर खऱ्या ब्राह्मण्याचा जयजयकार करीत जर हा मरण पावला, तर याला स्वर्गप्राप्ति तरी होईल. पण हें मरण नव्हे; मरण म्हणजे हानि नव्हे. तर मरण म्हणजे अवस्थांतर होय. मरण म्हणजे आत्म्याच्या उत्क्रांत स्थितीचा जन्म होय. उच्च ध्येय ठेवून मरणें म्हणजे उत्क्रांत आत्म्याला जन्म देणें होय. म्हणून म्हणतों कीं, हें मरण नसून—हा माझ्या लक्ष्मणाचा मृत्यू नसून—पवित्र कार्याचें शिखर गांठणें होय. हा मृत्यु म्हणजे भार्गवरामाच्या क्षात्र अहंकाराचा दीप विझविणारा झंझावात होय. जा ! लक्ष्मणा, आनंदानें स्वर्गात जा आणि तेथें स्वीकृत कार्याचा जयजयकार कर. इतक्या मोठ्यानें रामचंद्राचा जयजयकार कर कीं, रावणाच्या बंदिशाळेंत बंदिवान होऊन राहिलेल्या सर्व देवांना तो ऐकूं गेला पाहिजे आणि त्यांच्या मुक्ततेकरतां ईशशक्ति अवतीर्ण झाली आहे असा त्यांना विश्वास वाटला पाहिजे.

विश्वामित्रः—रामा ! लक्ष्मणाचें प्राणोत्क्रमण झालें ही बातमी जर राजा दशरथाला आणि राणी सुमित्रेला कळली, तर ते या सर्व दोषाचें खापर माझ्याच शिरावर फोडतील. तेव्हां लक्ष्मणाचे प्राण वांचतील अशी शक्य ती खटपट नको का करायला ?

रामचंद्रः—गुरुवर्य ! अशाहि प्रसंगीं आपण माझी कसोटी पहातां काय? महाराज ! माझा बंधु, माझी माता किंवा माझा पिता असल्या नश्वर मोहाला मोहून हतवीर्य होणारा हा विश्वामित्राचा शिष्य नव्हे ! कार्यकर्त्याला कार्याकरितां जसा आत्मयज्ञ करावा लागतो, तसाच त्याला प्रसंगीं लौकिकाचाहि यज्ञ करावा लागतो ! असले कार्यासाठीं—ध्येय साधतांना—अत्युच्च कांचनगंगाशिखर चढतांना दोष किती तरी माथीं बसतील; म्हणून कार्यकर्त्यांनीं माघार घ्यावी काय ?

विश्वामित्रः—अहाहा ! धन्य आहेस रामचंद्रा ! मी तुझा गुरु नव्हे,

तर तूंच माझा गुरु आहेस. कारण, भावी धर्मवीर जर आतां तुझ्यासारखेंच कार्यकर्ते निपजणारे असतील, तर आम्ही आतां गुरु म्हणून ह्यांनाच नमस्कार केला पाहिजे ( नमस्कार करूं लागतो. )

**रामचंद्रः**—( विश्वामित्राचे हात धरून ) गुरुवर्य, काय हें ? आपल्या तपश्चर्येची पुण्याई आणि आपल्या कर्तव्याची शक्ति यांचें वास्तव्यस्थान म्हणजे हा रामचंद्र होय. असें असतां आपण हें काय करीत आहां ?

**लक्ष्मणः**—वीरहो ! ऐकवा ! मला एकदां शेवटचा रामचंद्राचा जयजयकार ऐकवा !

**विश्वामित्रः**—बोला ! एकदां श्रीरामचंद्राचा जयजयकार बोला !

**सभासदः**—जय जय श्रीरामचंद्रमहाराज !

**लक्ष्मणः**—झाली ! माझी इच्छा पूर्ण झाली ! जनतेंत आत्मविश्वास उत्पन्न झाला. आतां मी मोठ्या आनंदानें सर्वांचा निरोप घेतों. येतों बरं ! ( उचकी देऊन मरतो. )

**रामचंद्रः**—लक्ष्मणा ! सत्याचें नामोच्चरण करतां करतां तूं स्वर्गारोहण केलेंस म्हणून तुझी चिता म्हणजे सत्यमय परमात्म्याची उज्ज्वल ज्योत होय. हे सत्यमय परमात्म्या ! हा माझा सर्व लौकिक मीं तुझ्या चरणीं अर्पण केला आहे. आतां तुझी अद्‌भुत शक्ति मला दे, एवढेंच माझें तुला मागणें आहे.

**परशुरामः**—( स्वगत ) आजपर्यंत सहस्रावधि वीरांचा मीं वध केला, त्यांच्या रक्तानें वाहणाऱ्या हजारों नद्या मीं पाहिल्या; पण त्यामुळें माझें खंबीर मन कधींच यत्किंचितहि दुर्बल झालें नाहीं. उलट तो भयंकर देखावा पाहून मनाला अधिकच उत्साह वाटत असे. पण आज या एका पोराचा मृत्युच माझें मन खचवीत आहे. पण छे ! मनाला असें कचरूं देतां कामा नये !

**विश्वामित्रः**—बाळा लक्ष्मणा !

**रामचंद्रः**—गुरुवर्य, मृताबद्दल आतां अश्रुपात कशाला ?

**विश्वामित्रः**—ही बातमी ऐकून लक्ष्मणाची माता सुमित्रा केवढा आक्रोश करील, ही कल्पना आली म्हणजे हृदय उचंबळून येतेंरे !

**परशुरामः**—रामा ! दुसऱ्याला ब्रह्मज्ञान सांगतोस आणि स्वतःच्या

डोळ्यांतून बंधुवियोगाबद्दल अश्रू कां गाळतोस ?

**रामचंद्रः**—नाहीं ! बंधुवियोगाबद्दल माझ्या डोळ्यांतून अश्रुपात होत नाहीं, तर आपल्यासारखे बलवत्तर तपस्वी अहंकाराच्या–पक्षपाताच्या–प्रभावळींत गुलाम होऊन राहतात आणि जगद्धारणेच्या पवित्र कार्याला मुकतात म्हणून हे अश्रू आहेत !

**परशुरामः**—असें काय ! मग लक्ष्मण जसा या परशूला बळी पडून मेला तसाच तूं—

**रामचंद्रः**—मी मरणार हेंच कीं नाहीं ? पण मी म्हणतों कीं, महाराज ! लक्ष्मण मेला नाहीं. आपल्या या टीचभर परशूंत लक्ष्मणाला ठार मारण्याची शक्ति नाहीं. माझा बंधु–माझा लक्ष्मण–मेला नाहीं, तर आपल्यासारख्याच्या कर्तव्यपराङ्मुखतेपासून मानव वीरांना होणारा ताप टाळण्याकरितां, तो त्या ईशशक्तीला येथें खेंचून आणण्याकरितां गेला आहे.

**परशुरामः**—हा तात्त्विक अर्थ घेऊन तरुणांनीं थोरांना अपमानास्पद वाटणारीं अशीं अनन्वित कृत्यें करावीं असेंचना तुझें म्हणणें ? ठीक आहे. तुला, तुझ्या गुरूला आणि तुझा जयजयकार करण्यास सिद्ध झालेल्या या सर्व वीरांना आत्तां नामशेष करून टाकतों. बोला पाहूं आतां पुन्हा जयजयकार !

**सभासदः**—जय जय श्रीरामचंद्रमहाराज !

**परशुरामः**—मला कोणीच कसे भीत नाहींत ? राजा जनका ! तुझ्या दरबारांत माझा असा अपमान ? ठीक आहे !

**विश्वामित्रः**—भार्गवरामा, अजून तरी शुद्धीवर ये. तूं जितकी निष्ठुरता धारण करशील, तितका अधिक आत्मविश्वास या सर्व वीरांत निर्माण होईल आणि ते स्वसंरक्षणार्थ समर्थ होतील. हे सर्व वीर तुला भयानें थरथर कांपत होते; पण तेच आतां तुला भीक न घालण्याइतके धैर्यशाली झाले आहेत. यावरून हा नरनारायण आतां तुझ्यावर रुष्ट झाला असेंच नाहीं का सिद्ध होत ? ज्या वेळीं क्षत्रिय ब्राह्मणद्वेष्टे बनले होते, त्या वेळीं हाच नरनारायण तुला अनुकूल झाला होता आणि म्हणूनच तुला एकवीस वेळां जयप्राप्ति झाली; पण तो काल आज नाहीं. कालप्रमाणें मार्ग बदलत असतात, म्हणूनच नवीन अवतार अवतीर्ण होत असतात. तूं जर आतांहि पूर्वाभिमानाला अंधपणें

चिकटून राहिलास, तर तुझ्या हयातींतच तुझा अवतार संपेल आणि नवीन कालाला अनुसरणारा असा नरनारायणाचा नवा अवतार म्हणून—जगाचा नवा शिक्षक म्हणून—हा माझा रामचंद्र पुढें येईल.

**परशुरामः**—माझा अवतार संपेल ? आणि हें पोर हा दुसरा अवतार होणार ? राजा ! तुला तुझ्या जानकीच्या कल्याणाची काळजी असेल, आणि तिलाहि जर चुडेदानाची अपेक्षा असेल, व यापुढचा भावी अनर्थ टळावा असें जर तुम्हां सर्वांना वाटत असेल, तर विश्वामित्रानें आणि रामचंद्रानें माझ्याजवळ क्षमा मागून प्राणदानाची याचना करावी. त्यावांचून यापुढचा अनर्थ टळणें शक्य नाहीं.

**जानकीः**—महाराज ! भावी अनर्थाची आतां कोणालाच कांहीं भीति वाटत नाहीं. आणि संकटांना भिऊन अंगीकारलेल्या कार्यापासून माघार घेणाऱ्या वीरपुरुषाला वीरकुमारी माळहि घालीत नसते.

**रामचंद्रः**—पण संकटांना भिऊन खरे वीर आपल्या पवित्र व शुद्ध साध्यापासून कधीं माघारहि घेत नसतात. धनुर्भंगाचा प्रश्नच तत्त्वाचा आहे. तत्त्वाच्या प्रसंगीं लहान मोठा भेद नसतो; असेंच मला हा लक्ष्मण—स्वीकृत तत्त्वाला ज्यानें आपला प्राण अर्पण केला तो—सांगत आहे.

**परशुरामः**—तर मग धनुष्याला बाण लाव आणि आपलें रक्षण कर; नाहीं तर एक घाव दोन तुकडे !

**रामचंद्रः**—काय ? " एक घाव दोन तुकडे ? " करा. खुशाल तो परशु माझ्या शिरीं घाला आणि माझे दोन तुकडे करा ! पण आपल्यासारख्या पासून—जे धड ब्राह्मणहि नाहींत व क्षत्रियहि नाहींत अशा भ्रष्टापासून—स्वतःचें रक्षण करण्याकरितां मला शस्त्राची अवश्यकता नाहीं. व आपणाला पराक्रमाचीच घमेंड असेल, तर आजपासून आपण स्वतःला क्षत्रिय म्हणा, मग पाहिजे तर धनुष्यावर बाण चढवीन. पण तोंपर्यंत कर्तव्यभ्रष्टच कां होईना—पण ब्राह्मण म्हणविणाऱ्यावर—दर्भाऐवजीं शस्त्र धरणाऱ्यावर—खरा क्षत्रिय शस्त्र उगारीत नसतो.

**परशुरामः**—बस्स ! पुरे कर आतां ह्या वल्गना ! कोणी शस्त्र धरो अगर न धरो. पण ब्राह्मणत्वाचें क्षत्रियांपासून रक्षण करण्याकरितां मी हे

पुन्हा क्षत्रियावर—

**रामचंद्रः**—होय. खरें ब्राह्मणत्व रक्षण करण्याकरितांच—तें शुद्ध राखण्याकरितांच—आपल्या परशूपासून माझें रक्षण व्हावें, एतदर्थ माझ्या लक्ष्मणाची दिव्यशक्ति माझ्यावर ईशशक्तीचें कवच घालण्याकरितां परमात्म्याच्या अद्भुत शक्तीला बांधून घेऊन भूमंडळावर अवतीर्ण होत आहे. पहा! पहा तो तेजोगोल! तपोनिधे, कदाचित् तो तुम्हांला दिसत नसेल, तर तो परशु माझ्यावर चालवा म्हणजे दिसेल.

**परशुरामः**—तर मग हा चालविलाच समज परशु!

**विष्णुः**—( पडद्यांतून ) परशुरामा! परशुरामा! हें काय आरंभिलें आहेस!

**परशुरामः**—हा कोणाचा शब्द!

**विष्णुः**—( प्रगट होऊन ) परशुरामा, हें काय करणार होतास? अरे! ब्राह्मवृत्ति ही सर्व वृत्तींचें जीवन असल्यामुळें, तिला प्राणापलीकडे जपण्याची जबाबदारी क्षात्रवृत्तीवर आहे; पण या पवित्र कर्तव्याची जेव्हां क्षात्रवृत्तीला विस्मृति पडते, तेव्हां तिला ज्ञानमार्गाला लावण्याचा अधिकार ब्राह्मवृत्तीला आहे. असें असतां तूं क्षात्रवृत्तिच नष्ट करून धर्माचें केंद्र असें हें आर्यराष्ट्र दुर्बल करण्याच्या मार्गाला लागला होतास, याचा अर्थ काय?

**परशुरामः**—भगवान्, भविष्यकाळ आपल्या कृपेनें मला दिसत आहे. पण त्या काळांतील कामगिरी आपण माझ्यावर टाकिली नव्हती. त्या काळांतील कार्यकर्ता रामचंद्र आहे, याची आजच्या जगाला ओळख पटावी म्हणून मीं हा उलट दिशेचा मार्ग स्वीकारला होता. त्यामुळेंच त्याला रामचंद्राची पूर्ण ओळख पटली व ब्रह्मर्षि विश्वामित्राचा कर्मयोग फळाला आला. आतां हे सर्व धर्मवीर भविष्यकाळाशीं झगडण्याइतके बलवत्तर झाले!

**विष्णुः**—माझ्या कार्याचें तुला स्मरण होतें, याची आतां या जनतेला जाणीव झाली; तेव्हां इतःपर तिचा तुझ्यावर कोप राहणार नाहीं. आतां तुझें शस्त्र व सामर्थ्य रामचंद्राला अर्पण कर; म्हणजे ब्राह्मण्याच्या

रक्षणार्थ क्षात्रवृत्ति सामर्थ्यवान् व कर्तव्यतत्पर झाली, याचा जगाला अनुभव येईल. ( परशुराम तसें करतो. ) रामचंद्रा ! रावणाच्या बंदिशाळेंतून तेहतीस कोटी देव मुक्त करून जगावर विश्वव्यापी धर्माचें—त्या खऱ्या ब्राह्मण्याचें—दर्शक असें पवित्र रामराज्य स्थापन कर म्हणजे माझा—या नर-नारायणीय शक्तीचा—अवतार म्हणून महाकवि तुझें स्तोत्र गातील. बाळा लक्ष्मणा, ऊठ ( लक्ष्मण उठतो ). तूं पवित्र कार्यावर श्रद्धा ठेवून मोठ्या आनंदानें स्वात्मार्पण करण्याला सज्ज झालास म्हणून तुझी निष्ठा या माझ्या शेषाप्रमाणें अढळ गणली जाईल. आणि तूं कार्यकर्त्यांचा कर्ता अनुयायी म्हणून जगताला आदर्शभूत होशील.

**विश्वामित्रः**—करा ! ब्राह्मण्याचा जयजयकार म्हणून श्रीरामचंद्राचा जयजयकार करा !

**सर्वः**—जय जय श्रीरामचंद्रमहाराज !

**विष्णुः**—राजन्, आतां जानकीला स्वयंवराची माळ रामचंद्राच्या गळ्यांत घालायला सांगा.

**राजा जनकः** —बाळे ! भगवंताच्या आज्ञेनुसार या नर—नारायणाच्या नूतन अवताराला स्वयंवरमाला अर्पण कर; आणि त्याबरोबरच जगत्कल्याण साधून संसार—हा कौटुंबिक नव्हे; तर आपला विश्वव्यापी संसार—आनंदानें करून सर्व स्त्रियांना वंदनीय हो. (जानकी माळ घालते; मुली ओंवाळतात)

---

सर्वजण—

## वरस्तोत्र

( चाल—नंदा नंदा शांता )

श्यामा! आनंदाच्या धामा।
विजय तुजला लाधो श्रीरामा ॥
विमला समता ही सुररामा।
मुक्त करोनि तूं दे आरामा ॥ ध्रु० ॥
जिजला छळितो। तिजला पिडितो।
रावणराणा सुरद्वेष्टा तो।
तयापासोनि बुधतापहरी।
मग तव चरणीं लोळो जन-मा ॥ १ ॥

नरनारायणार्पणमस्तु।

मंदोदरी:—होय महाराज, धर्म हा कर्तबगार पुरुषानेंच निर्माण केला, व तो कर्तबगार पुरुषाच्याच हातांतील बाहुलें आहे, हें आपलें म्हणणें खरें आहे. पण खरे कर्ते पुरुष, धर्म हा जगदुद्धाराकरितां निर्माण करितात; महाराज, स्वतःकरितां नाहीं. व्यक्तिमात्रांच्या चैनीकरितां निर्माण होणारा धर्म हा धर्म नसून स्वार्थी लोकांनीं आपली अघोर तृष्णा शमविण्याकरितां जिभेवर चढविलेला नकली मुलामा होय. असला नकली मुलामा अधिक काळ टिकत नाहीं; आणि म्हणूनच त्याची धर्म या जातिवंत जिवंत शक्तीशीं तुलना करितां येत नाहीं.

रावण:—मंदोदरी, धर्माचें रूप तुझ्या दृष्टीनें तुला कसेंहि दिसो; पण माझ्या—या त्रैलोक्याधिपति लंकाधीशाच्या—मुखांतून निघालेला सहज शब्द सर्व जगताला धर्मवाक्य म्हणून मान्य करायला लावीन आणि जनकाकडलि पण जिंकून सर्व त्रिभुवनांत मी बलवान ठरल्यावर या गोष्टीचें प्रत्यंतरहि तुला लवकरच आणून देईन.

मंदोदरी:—आपल्या पराक्रमाबद्दल व कर्तबगारीबद्दल त्रैलोक्यांत मतभेद असण्याचा संभवच नाहीं. परंतु महाराज, पराक्रमाच्या शक्तीचा व कर्तबगारीचा, या शुद्ध गंगायमुनांचा ओघ निरहंकारी अशा अफाट समुद्राकडे न वळतां जेव्हां उलट दिशेला, म्हणजे अहंकाराच्या हिमालयाकडे उलट वळतो, तेव्हां त्या कोरड्या ठणक पडतात. अशा उलट दिशेल वळलेल्या पराक्रम शक्तीला व कर्तबगारीला प्रत्यंचा चढवून पण जिंकतां येईल, असें मला वाटत नाहीं. कारण, दर्पानें हत्तीसारखें फुगलेलें मन लहानशा मुंगीलाहि भारी नसतें, हें विसरूं नका! पण जगन्माता त्याऐवजीं मानभंग न करो म्हणजे झालें.

रावण:—मंदोदरी, माझा मानभंग करण्याची कुणाची प्राज्ञा आहे! माझा मानभंग करण्यास जर सिंहासनारूढ महान पराक्रमी एकादा सम्राट असला, तर त्याला सिंहासनावरून ओढून त्याचा राजमुकुट मी लाथेनें तुडवून टाकीन!

रा. बामणगांवकरकृत

पुढील नवीं नाटकें

संगीत

# सवतीमत्सर

( सामाजिक )

संगीत

# सतीप्रभाव

अर्थात्

# द्रौपदीवस्त्रहरण

# ज्ञानाचीं खुलीं द्वारें!